# आशानिराशा





लेखक.
म. ना.
टिपनीस

इकेरी – "विरहिणि झुरते मजोला नार रुक्र" ।

Photo by M. N. Kirtikar, Bombay.] [Blocks by Manoranjan Press, Bombay.

# आशा–निराशा

( गद्यपद्यात्मक नाटक. )

लेखक

श्रीयुत यशवंत नारायण टिपणीस.

'कमला,' 'मत्स्यगंधा,' 'राधामाधव,' 'जरासंध,' 'चंद्रग्रहण,'
'राज्यारोहण,' शहाशिवाजी,' 'गुरुचरणीं,' 'पुण्याचा
मार्ग,' 'रामशास्त्री,' 'गड कुणाचा,' इ०

नाटकांचे कर्ते.

---

प्रकाशक

श्रीयुत विश्वनाथ गोपाळ शेटये,
पार्वतीवाडी, माहिम, मुंबई.

---

मनोरंजन प्रेस.

प्रथमावृत्ति.

सन १९२३.

किंमत सव्वा रुपया.

# समर्पण.

## कै. ती. भिकाजी नारायण उर्फ तात्यासाहेब टिपणीस.

महाराष्ट्र नाटक मंडळीच्या मूळ उत्पादकांपैकीं आपण एक असून, उत्तम चित्रकार, बुद्धिवान् एंजिनिअर व शोधक शेतकरी ह्मणून आपला सर्वत्र लौकिक आहे. लोकोपयोगी कामें अंगावर घेऊन ती धडाडीनें पार पाडतांना आपण स्वतःच्या प्राणांचीहि पर्वा केली नाहींत. आपला देशाभिमान इतका उत्कट होता कीं, निराळ्या काळीं शूर सेनापति ह्मणूनच आपलें नांव गाजलें असतें. रायगडावरील कित्येक ऐतिहासिक स्थळें मातीचा पडदा दूर सारून आपण महाराष्ट्राच्या नजरेस पाडलींत. मरणसमयीं श्रीशिवाजी महाराज व महात्मा गांधी यांच्या नांवांचा जयघोष करून रायगडच्या गंगासागरांत–महाराष्ट्राच्या राष्ट्रतीर्थांत आपल्या अस्थि विसर्जन करण्याची आपण आज्ञा केलीत. आपल्यावरील निस्सीम भक्तीमुळें हें माझें 'आशा–निराशा' नाटक आपल्या स्वर्गीय आत्म्यास मी अर्पण करीत आहें.

आपला बंधु,
आप्पा.



कै. भिकाजी नारायण ऊर्फ तात्यासाहेब टिपणीस.

[ Blocks by Manoranjan Press, Bombay.

# वंदन.

आशानिराशांच्या झगड्यांत सांपडलेलें 'आशा–निराशा' नाटक प्रयोगरूपानें व पुस्तकरूपानें प्रकाशित होण्याचा सुयोग आज विजयादशमीला आला ही परमेश्वरी कृपाच होय! **डॉ. भडकमकर, डॉ. गोळे** व **डॉ. मंगेशराव परुळकर** यांनीं मला जिवावरच्या दुखण्यांतून वांचविलें, याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत. गंधर्व नाटकमंडळीचे मालक श्री. **बालगंधर्व** यांनीं अनेक अडथळे आले असतां सुद्धां उत्साहपूर्वक नाटक बसवून तें नेटानें, उत्तम सजावटीनें रंगभूमीवर आणिलें व मला हरएक प्रकारचें साहाय्य केलें याबद्दल मी त्यांचा ऋणी आहें. श्री. **कृष्णराव** ( मास्टर कृष्णा ) यांनीं नाटकांतील प्रसंगांस शोभतील अशा चाली स्वतःच्या कल्पनेनें निर्माण करून दिल्या म्हणून त्यांचेहि आभार मानणें जरूर आहे. **गंधर्व नाटक मंडळींतील नटांनीं** नाटकांतील निवडक प्रसंगांचीं छायाचित्रें दिलीं व सुप्रसिद्ध फोटोग्राफर श्री. **एम्. एन्. कीर्तिकर** यांनीं अत्यंत कुशलतेनें तीं घेऊन अगदीं अल्पावधींत तयार करून दिलीं, व त्यांचे सुंदर ब्लॉक फार त्वरेनें मनोरंजन प्रेसमधील श्रीयुत **वी. के. सावंत** यांनीं करून दिले, याबद्दल या सर्वांचा मी आभारी आहें. श्री. **वि. जि. नाडकर्णी** यांनीं पुस्तकाचें स्वरूप शक्य तितकें मनोहर व्हावें म्हणून कांहीं उपयुक्त सूचना केल्या व माझ्या आजारीपणांत पुस्तक छापत असतां, त्यासंबंधीं सर्व काम स्वतः पाहून मला अत्यंत ऋणी करून ठेविलें आहे. श्री. **दामोदरपंत मित्र** व श्री. **शांतारामजी आजगांवकर** यांनीं **मनोरंजन प्रेसच्या** लौकिकाला साजेसें छपाईचें काम करून फारच अल्पावधींत पुस्तक तयार करून दिलें, याबद्दल त्यांचा व मनोरंजन प्रेसमधील मंडळीचा मी अत्यंत आभारी आहें. सुप्रसिद्ध ज्योतिषि श्री. **गुर्जर**, प्रख्यात नाटककार **प्रो. वि. गो. शेट्ये** ( या पुस्तकाचे प्रकाशक ), श्री. **पंडित**, श्री. **शंकरराव सरकार**, श्री. **राणे**, श्री. **कीर्तिकर**, **चि. प्रभाकर गुप्ते, चि. मधुकर देशपांडे, चि. द्वारकानाथ देशमुख**, श्री. **केदार गुप्ते**, श्री. **रेगे**, श्री. **केशवराव बोडस**, श्री. **मनसुखराम धुमे**, यांनीं व माझ्या इतर अनेक मित्रांनीं वेळोवेळीं मला निरपेक्ष बुद्धीनें साहाय्य केलें याबद्दल त्यांचेहि आभार मानिलेच पाहिजेत.

पार्वतीवाडी, माहीम.
आश्विन शु॥ १०, शिवशक २५०.

सर्वांचा ऋणाईत,
**यशवंत नारायण टिपणीस.**

## पुरवणी मजकूर.

( पान ६४ वर अंक ४ प्रवेश ३ च्या शेवटीं. )

लंका— देवा! आज आह्मां सर्वांनां तूं आनंदाचा दिवस दाखविलास, त्यावर विरजण घालूं नकोस एवढीच या मुलीची प्रार्थना आहे.

( द्रप. राग–बागेश्री, ताल त्रिवट. )

पाजुनियां सदया सुधारस। गरल बिंदु नच द्या या ॥ धृ० ॥ सुरुचिर बाला। करिं सुममाला। अघटित लीला। प्रकटवि सुख तिज व्हाया ॥ १ ॥

॥ श्री ॥

# आशा-निराशा.



## नांदी.

[ आशा, निराशा व प्राणी ईशस्तवन करीत आहेत. ]

[ पद, राग-भूप. ताल-त्रिवट. ]

श्रीपति सुखवित सूत्रयुत जगत। अविरत भ्रमत सुदर्शन हातीं ॥ ध्रु० ॥ अनंत तारा सूर्य शशि धरा। अचल चल फिरत वेगें प्रभुकर गुंफित सूत्रीं ॥ १ ॥

प्राणी— पुरें सौख्य हें खाद्यपेयीं विलासीं। पराधीनता भासली शांततासी। पहा उन्नतीची उषा ही विराजे। मना लाभतां मोक्ष स्वातंत्र्य गाजे ॥ २ ॥

निराशा— वृथा मोक्ष गे ताप होईल वायां। निराशा स्वयें पातली सौख्य द्याया। महावात गर्जे दिशा धुंद झाल्या। निशा क्षोभली मोक्षवाटा निमाल्या ॥ ३ ॥

आशा— नको भीति जीवा निवारीन क्लेशा। सवें येत आशा त्यजीं ही निराशा। सुखें चाल ध्येया नको धैर्य सोडूं। पथीं चक्रतेजें निशापाश फोडूं ॥ ४ ॥

निराशा—( हात ओढून ) जगीं भोग नाना विलासां सुखां घे।

आशा—( दुसरा हात ओढून ) त्वरें चाल गे लागि मोक्षास वेगें।

प्राणी— प्रभो धांव रे सोडवीं या जिवाला। निराशा —सुखाशा—करीं त्रस्त झाला ॥ ५ ॥

विष्णु—( प्रगट होऊन ) अनुसर आशा त्यागिं निराशा। स्मरण मम करित जीवा जाशिल मोक्षा अंतीं ॥ ६ ॥

( विष्णु गुप्त होतात. पडद्यांत नांदीचा चरण प्रथम सुरू होतो. आशा व प्राणी एकीकडे व निराशा दुसरीकडे जातात. )

---

# अंक पहिला.

## प्रवेश पहिला.

स्थळ—दिवाणखाना.

[ सारंग व लकेरी येतात. ]

लके०—दादा! हमीर-हमीर-हमीर-हमीर! पुष्कळ झालं तुझं हमीरांचं पुराण! चार दिवससुद्धां ओळख होऊन झाले नाहींत तोंच बनलास त्यांचा भाट! तुझ्या वर्णनावरून मला तर ती एक अट्टल व्यक्ति दिसते.

सारं०—ताई! हमीरांना तूं अजून काळे का गोरे ते पाहिलेस सुद्धां नाहींस, आणि एकदम त्यांच्याबद्दल वाईट मत करून घेतेस?

लके०—उगीच नाहीं करून घेत. कुणाबद्दल माझं मत कधींच चुकत नाहीं.

सारं०—मी इतकी घमेंड मारीत नाहीं. पण हमीरांच्या बाबतींत ताई, आपली खास फजिती होणार.

लके०—माझी फजिती होणार? दादा, मी नांवाची लकेरी आहें, लकेरी!

सारं०—तूं लकेरी आहेस तसाच मीही तुझा भाऊ सारंग आहें.

लके०—सारंग ह्मणजे हरीण! तें मृगजळाच्या मागं लागून शेवटीं फसायचंच! दादा, या मुंबईंत अशीं किती तरी माणसं आहेत, कीं

वरच्या थाटावरून अगदीं संभावित घरंदाज वाटतात, पण आंतून पक्कीं पाजी हलकट असतात. हे तुझे हमीर अशाचपैकीं एक असतील झालं. दादा, तूं त्यांच्या नेकटाय्–कॉलर–बूट–पॅन्टना भाळलेला दिसतोस. माझं ह्मणणं खोटं झालं तर नांव बदलून देईन.

सारं०—असं ! मग आतांच तुला पाळण्यांत घालून दुसरं नांव ठेवायला हवं. कारण हमीर नेकटाय्, कॉलर, बूट, पॅन्ट असा विलायती ड्रेस मुळींच करीत नाहींत. अगदीं हातरहाटावरच्या–हातमागावरच्या–शुद्ध स्वदेशी खादीची सदराटोपी ते घालतात.

लके०—खादीची सदराटोपी ना ? मग तर तो पक्का भोंदु असला पाहिजे. अलीकडे बरं झालंय् आपलं. चोर असो, चहाड असो, अगर एखादा पाजी लफंगा मवाली असो, खादीची सदराटोपी घातली, कीं बनला देशभक्त ! लागले लोक त्याच्या भजनीं !

सारं०—पण ताई, अशा याच्या त्याच्या भजनीं लागणाऱ्या लोकांपैकीं मी नाहीं. खादीवाल्या लोकांबद्दल मला कितीसा आदर वाटतो ? उलट त्यांनां हंसणारांपैकींच मी एक आहें. खरोखर मला तें एक वेडच वाटतं. पण अमका एक खादी वापरणारा हलकट असला ह्मणून सरसकट बारा टक्के सगळे–सगळे खादीवाले हलकटच असले पाहिजेत असं समजणं ही केवढी चूक आहे ! महात्मा गांधी ज्या तत्त्वाकरितां खादी वापरतात, त्याच तत्त्वाकरितां हमीरही खादी वापरतात.

लके०—मोर नाचतो ह्मणून लांडोर नाचते ! गांधींचं अनुकरण करून हे आतां महात्माजीच होणार ! वाः महात्मा हमीर ! केवढे महात्मा !

[ पद. राग–विहाग, ताल–त्रिवट. ]

ही का मान्यता । नटमति झुलविति अजाण जनता ॥ ध्रु० ॥ खर जरि सजला शार्दुल साचा । काय वरिल बल । रव जरि विशाल ॥ १ ॥ काक निज पिसां । लावि मोरसा । राजहंस नच । गणतिल तयास ॥ २ ॥

सारं०—ताई ! आपल्याला ज्या माणसांबद्दल माहिती नाहीं त्यांची अशी भलतीच हेटाळणी करूं नये.

लके०—दादा ! तूं तरी हमीरावरून एवढा हमरीतुमरीवर कसा येतोस ? हमीरांच्या वर्तनाची तूं एवढी हमी तरी कशी घेतोस ? आठ पंधरा दिवस एका हॉटेलांत चहाकॉफी घेतलीत, नमस्कारचमत्कार केलेत, गप्पागोष्टी सांगितल्यात ! याच्या पलीकडे तुला तरी काय रे माहिती आहे त्यांची ? का त्यांचं घर पाहिलंस ? का त्यांच्या आईबापांची भेट घेतलीस ? का त्यांच्या कुलशीलाची चौकशी केलीस ?

सारं०—माझ्या बहिणीचं त्यांच्याशीं लग्न जमवायचं असतं ह्मणजे सगळी खडान् खडा माहिती काढली असती बरं. बाकी हमीर अविवाहितच आहेत हो ताई !

लके०—असतील हो ! भलतंच कांहीं तरी बोलतोस झालं.

सारं०—भलतंच कसं ? ताई, हमीर हिरा आहे हिरा ! स्वयंप्रकाशित तारा आहे.

लके०—पुरे झाली स्तुति ! आपले फार तारे तुटायला लागले. फार भाळला आहेस त्यांच्यावर ! बायको झाला असतास तर मला वाटतं त्यांच्याशीं लग्नच करतास.

सारं०—खास करतों ! तूं सुद्धां—पण मी आतांच कशाला बोलूं ? नऊ वाजले ना ? आतां येतील ते. हातच्या कांकणाला आरसा नको. घोडामैदान अगदीं जवळ आहे. मीं मुद्दाम त्यांना चहालाच बोलावलं आहे आतां.

लके०—मग मी आपली जातें खोलींत. आपण करा त्यांचं आदरातिथ्य ! तुझ्या ह्मणण्याप्रमाणं ते विद्वान् रसिक असोत, एम्. बी. बी. एस्. किंवा एम्. डी. असोत, किंवा देशाचे पुढारी असोत, मला त्यांच्याशीं कांहींएक करायचं नाहीं. आपण बसा त्यांना घेऊन. माझ्या वाटेला जाऊं नका. नाहीं तर आपल्याला आमच्या कौतुकाची उकळी येईल आणि ताई ह्मणून मोठ्यानं आह्मांला हाक माराल ! मी जातें आपली.

सारं०—चाललीस कुठं? ते पहा हमीर आलेच. वाः! अगदीं वेळे-वर आलांत! (हमीर येतो.) या. या बसा.—हमीर! ही लकेरी—

हमी०—आपली बहीण! वाः, आपल्या भेटीचा मोठाच लाभ झाला.

[ पद. राग-हमीर, ताल-त्रिवट. ]

निवास लाधला हा जिवास । जलनिधि तृषिताला
भाग्यबलें ॥ ध्रु० ॥ विहरत व्योमीं । प्रतिभा शशियानीं ।
सदय कर स्नेहबलें ॥ १ ॥

बसा. आपण उभ्या कां? सारंग, आपले वडील कुठं बाहेर गेले आहेत?

सारं०—होय. ते रोज पहांटेस फिरायला निघतात ते स्नेहीमंडळीच्या भेटी घेत घेत दहा वाजतां परत येतात. बरं, मी चहा सांगतों अगोदर.

लके०—तूं बैस दादा, मी जातें सांगायला.

सारं०—नाहीं, तुला समजायचं नाहीं; मीच जातों. आतां येतों दोन मिनिटांत परत. [ सारंग जातो.

हमी०—जाऊंद्या कीं त्यांना; आपण बसा, आपण कां जातां?

लके०—(स्वगत) आतां काय बाई बोलावं यांच्याशीं? मला कसंसंच झालं आहे.

हमी०—आपण यंदांच बी. ए. झालांत?

लके०—हो.

हमी०—पुढं काय वऱ्हाडांत जायचा विचार आहे?

लके०—हो. पण—

हमी०—म्हणजे अजून अवकाश आहे? नक्की नेत नाहीं?

लके०—हो.

हमी०—त्या क्रॉनिकलमध्यें काय पहातां? न्यू व्हेकन्सीज?

लके०—नाहीं.

हमी०—मग काय वॉण्टेडच्या जाहिराती?

लके०—हो—नाहीं—

हमी०—आम्हांला पाहिजे—देतां का जरा तो क्रॉनिकल?

लके०—हा–घ्यावा.

हमी०—सबंद नको मला. एक पान पुरे. आपणांस असूं द्या बाकीचा.

[ वाचीत बसतो.

लके०—( स्वगत ) माझा मलाच राग आला आहे. शब्दच निघत नाहीं तोंडांतून ! मी अगदीं नर्व्हस् झालें आहें ! उपवर मुलीला कुणीं पहायला आलं, कीं असंच होत असेल बाई ! पण ती अशिक्षित असली तरी खास तिची माझ्या इतकी गडबड उडत नसेल ! लग्नासाठीं ती एक उमेदवारच असल्याकारणानं तिच्या जिव्हेवर नाचत असलेलीं परीक्षक वराच्या ठराविक प्रश्नांचीं उत्तरं धीरानं पावलं टाकीत तिच्या मुखांतून बाहेर पडतात. शिवाय वडील माणसं जवळ असल्यामुळं तिला धीर असतो तो निराळाच. दादा इथं असता तर—पण हे मला पाहायला कुठं आले आहेत ? पण पाहायच्या निमित्तानं आले नसले तरी जें व्हायचं तें झालंच की !

पद. [ राग–जिल्हा काफी. ताल–त्रिवट. ]

काया सुखमया । स्फुरतां माया हृदयिं या । अधिर प्रिया । मिलन तव व्हाया ॥ ध्रु० ॥ प्रणयराग चपला चमकुनियां । उजळित मार्गीं प्रिया । तुरवि भया । प्रणय-रणिं जाया ॥ १ ॥

हमी०—( स्वगत ) हा क्रॉनिकल हातांत आहे, पण माझ्या नेत्रांनीं लकेरीचं मनोगत हस्तगत करण्याकरितां तिच्या अंतःकरणाच्या बुरजावर मारा चालवला आहे. प्रेमाचं लक्षण आणखी तें काय असायचं आहे ? खरोखर लकेरीचं लावण्य म्हणजे देवांच्या चित्रकलेचा एक नमुना आहे. काव्याचा अर्क आहे ! संगीताची लकेर आहे !

[ पद. राग–खमाज–जिल्हा. ताल–दीपचंदी. ]

वाजे बांसरी । हांसरी सुमापरी । मुरारी–मुखीं खरी मधुर लकेरी ॥ ध्रु० ॥ मदनबाण उरिं भरि पिचकारी । रंग करी मम प्यारी ॥ १ ॥



सारंग—आँ! तुह्मी दोघं—एक इकडे एक तिकडे, वर्तमानपत्रं घेऊन वाचीत बसलांत वाटतं? (पान ११.)

Photo by M N. Kirtikar. Bombay. ] [ Blocks by Manoranjan Press, Bombay.

( सारंग व चहाचा ट्रे घेऊन एक नोकर येतो. )

सारं०—आँ ! तुम्हीं दोघं—एक इकडे एक तिकडे, वर्तमानपत्र घेऊन वाचीत बसलांत वाटतं ? वाः ताई !

हमी०—नाहीं, आम्हीं बोलतच होतों; पण इतक्यांत क्रॉनिकल पाहिला तेव्हां चाळीत होतों जरा. मी बोलतच होतों—

सारं०—पण ही बोलत नव्हती ! होय ना ? आमच्या ताईला बोलायला नको, असा मात्र समज करून घेऊं नका हो. जरा थोडा परिचय व्हावा लागतो प्रथम. होय ना ग ताई ? हमीर, प्रथम आमच्या ताईचा नामकरण-विधि उरकून घेऊं आणि मग चहा घेऊं. तिला पाळण्यांत घालायची आहे ! तुह्मांला पाळणा येतो का ? नाहीं तर मीच ह्मणतों. ( लकेरीस हालवून ) जो जो जो जो गे । लकेरीताई । तुझं नांव ठेवायची झाली मला घाई ॥ जो जो जो जो गे ॥

लके०—वाः, काय पण कवित्व !

हमी०—पण सारंग, हा नामकरणाचा विधि, ह्मणजे मला नाहीं कळलं ?

लके०—दादा ! बघ हो ? बघ बोलशील तर—

सारं०—नाहीं नाहीं, सगळं नाहीं बोलत यांच्याशीं ! हमीर, ताईनं आमच्याशीं पैज लावली आहे, कीं तिचं ह्मणणं खोटं झालं तर तिनं नांव बदलायचं. पैज तिच्या अंगावर आली, आतां तिचं नांव बदलून दुसरं ठेवायला नको का ?

हमी०—अहो पण सारंग ! नांव बदलायची पैज बायकांना काय कामाची ? अहो, नांव बदलण्यांत त्यांना कसला आला आहे कमीपणा ? त्यांचं लग्नांत नांव बदलायचं असतंच.

सारं०—अरेच्या ! होय की. हें नव्हतं माझ्या लक्ष्यांत आलं.

लके०—पण लग्नांत तर मी मुळींच नांव बदलूं द्यायची नाहीं !

सारं०—ऐकलंत हमीर ? मग आतांच बदलूंया ! हमीर, तुमच्या हस्तें हा विधि उरकून टाकूं.

लके०—दादा ! पुरे झाली थट्टा आतां. चहा निवून चालला. हमीरांना पाहुणचाराला बोलावून थंडा चहा देणार वाटतं ?

सारं०—आमची ताई बोलायला लागली ! अहो, मघाशीं तुम्ही यायच्यापूर्वी–तुम्हांला—

लके०—दादा ! बघ हो पुन्हां सांगतें—

सारं०—मी मुळींच नाहीं सांगत यांना तें. मघाशीं तूं हमीराबद्दल काय बोलत होतीस, त्यांना कशा शिव्या देत होतीस, पाजी–हलकट–लफंगा–मवाली वगैरे त्यांच्यावर कसा पदव्यांचा वर्षाव चालला होता, कांहीं सांगत नाहीं.

लके०—हमीर, दादाची सदा अशीच थट्टा चालायची ! तुम्हीं ऐकूं नका त्याचं ! हा चहा घ्या आपले.

सारं०—पुन्हां चुकलं ! वन्स मोअर, नांव बदला ! पुन्हां पाळण्यांत घाला. हमीर चहा घेत नाहींत–दूध घेतात–ताई ! तुझे सगळे अजमास चुकताहेत आज.

लके०—खरंच का आपण चहा घेत नाहीं ?

हमी०—नाहीं–कधींच नाहीं.

सारं०—पण तूं सांगत असलीस तर घेतील कदाचित्.

लके०—मीं सांगितलं तर आपण चहा घ्याल ? होय ?

हमी०—माझी खात्री आहे, कीं तुम्ही भलताच आग्रह करणार नाहीं.

लके०—मग आपण चहा घेत नसाल तर मीही नाहीं घ्यायची !

सारं०—अरेच्या ! हें उलटं झालं हं ! दुनयेचं रहाटगाडगं असं उलटं सुलटं चालायचंच ! मग काय ठरलं शेवटीं ?

हमी०—मी आणि तुमच्या ताई हा दुधाचा कप अर्धा अर्धा घेऊं. त्यांनीं आजपासून चहा सोडला आहे.

सारं०—वाः ! आपण वकिली केव्हांपासून सुरू केलीत ? या नॉन-को-ऑपरेशनमुळें कांहीं वकिलांनीं वकिली सोडली तेव्हां डॉक्टरीची प्रॅक्टिस सोडून तुम्हीं वकिली सुरू केलीत वाटतं ? या डॉक्टर लोकांनीं हल्लीं सगळ्या

धंद्यांत धुमाकूळ घातला आहे. विमाकंपन्या ह्मणूं नका–फॅक्टरीज ह्मणूं नका–वर्तमानपत्रं ह्मणूं नका–राजकारण ह्मणूं नका, सगळ्या चळवळींच्या नाड्या डॉक्टरांच्या हातांत आहेत. रागावूं नका बरं हमीर.

[ चहा घेऊं लागतात.

हमी०—रागवायचं काय कारण ? तुमचं ह्मणणं कांहीं अंशीं खरंहि आहे. पण नुसती मॅट्रिक किंवा अगदीं अक्षरशत्रु माणसं कोणताही धंदा करायला लायक असतात, आणि फक्त डॉक्टरीची परीक्षा दिली ह्मणून आह्मी नालायक ठरतों, होय ना ?

सारं०—त्याचं असं आहे—

लके०—दादा ! वहिनी आली. [ लंका ( वेडी ) येते. ] ही आमच्या दादाची बायको. दोन वर्षं झालीं असं वेड लागलं आहे. तिची ओळखच नाहींशी झाली आहे. जरा निमूटपणं ऐका.

लंका—

[ पद. कवाली, त्रिवट. ]

हजरत सलाम घ्यावा । मजला निकाल द्यावा । देवा ! ॥ ध्रु० ॥ बागबगीचा फळाफुलांचा । कोणि काय तुडवावा । देवा ! ॥ १ ॥ जोड बाळिचा दसलाखांचा । सागरांत हरवावा ! । देवा ॥ २ ॥ मायपित्याचा जीव जिवाचा । कालपाशिं गुजरावा । देवा ! ॥ ३ ॥

लके०—वहिनी !

लंका—( लकेरीस ) कोण आपण ? आपणच का ? आमचे पतिराज ! या–या–या गडे–या हो. फार दिवसांनीं भेटलास पोपटा ! नीज नीज. जो जो गाई ! अंगाई ! माझं बाळ तें. आई आतां येईल हो ! गाईच्या गोठणींत । वासरूं चारा खात । काळाची स्वारी येत । अंगाई ॥

हमी०—यांना माहेरचं कुणी मायेचं माणूस नाहीं का ?

सारं०—कुणीही नाहीं. आईबाप आणि दोन लहान भाऊ एवढींच माणसं होतीं. पण इन्फ्लुएन्झाला तें पाहवलं नाहीं ! दोन वर्षांपूर्वी घाड

घालून त्यानं काळाच्या घरीं ओढून नेलीं. हमीर, मी इतका आनंदी आहें, पण या एका गोष्टीनं साऱ्या आनंदावर विरजण पडतं. मनासारखी बायको मिळाली, हौसेनं लग्न लावलं, सासुसासऱ्यांनीं जांवयाचं कोड-कौतुक केलं, एक वर्ष सुखासमाधानांत आनंदांत गेलं ! पण एका क्षणांत ग्रहदशा फिरली. आयुष्याची अंधारी रात्र बनली !

लंका—आई–आई–बाळ उठला ग. त्याला पाज गडे. बाबा, तुह्मी कुठं चालला ? पुन्हां नाहीं यायचेत ? आई, तूं तरी नको जाऊं. बरं जा. माझं नाहीं ऐकत ? मी तुह्मांला मेल्यासारखीच ना ? ( रडते. )

सारं०—हमीर ! हिचा एक एक शब्द काळीज चिरून जात आहे. बाबा ह्मणतात, दुसरं लग्न कर. पण एक बायको टाकून दुसरी करणारा मी नाहीं. हिला वेड लागलं ह्मणून मी दुसरं लग्न करूं ?

लके०—हमीर ! बोलायची गोष्ट नाहीं, पण आमच्या बाबांचं सगळं लक्ष्य पैशावर ! दादाचं दुसरं लग्न कशाकरितां, तर पुन्हां चांगला हुंडा मिळावा ह्मणून ! वहिनीला वेड्याच्या इस्पितळांत पाठवायला किती वेळां निघाले. पण आह्मींच ह्मटलं, तुमच्याजवळ आहे हें कुणाचं ? तिचंच. तिच्या माहेरच्या बारा लाखांच्या मिळकतीवर आह्मीं चैन करायची—मोटारगाड्या उडवायच्या—आणि तिनं बिचारीनं त्या भयाण इस्पितळांत एका कोठडींत दिवस काढायचे ! शोभतं का हें आह्मांला हमीर ?

लंका—सोनुकल्यांनों ! तुह्मीं कुठं रे आहां ?

पद

तिळभर मना न आशा । जमली निशा निराशा । बाई ॥
रविकर रुसोनि गेला । दिवसा प्रकाश अटला । बाई ॥
कुठवर धरूं धिराला । उरला जिवा न थारा । बाई ॥
हुरहुर मना न सोडी । कुठली सुखांत गोडी । बाई ॥
शिरली उरांत बरची । तुटली ध्वजा मजेची । बाई ॥

सारं०—लंके ? असं काय करतेस ?

लंका—तुह्मी कोण ? ठमाबाई ! आपण कुणाच्या आई ? पण मला बोलायला वेळ नाहीं बाई !

[ लंका जाते.

सारं०—हमीर ! माझ्या पूर्वजन्मींच्या पातकामुळं माझ्या स्वर्गांतून—मला देवांनीं ढकलून दिलं; तें माझं स्वर्गीय पद मला पुनः लाभण्याची आशा आहे का हो ?

हमी०—सारंग ! आशा वाटून शेवटीं निराश होण्यापेक्षां आशाच नसलेली बरी ! आमच्या डॉक्टरी उपायानं हें वेड जाण्याची मुळींच आशा नाहीं.

लके०—अजूनपर्यंत डॉक्टरी उपाय थोडे का झाले ? डॉक्टर बिलावरनीं सुद्धां हात टेंकले.

हमी०—मायेचीं माणसं मृत्युमुखीं पडल्यामुळं, किंवा अनिवार दुःखाचा धक्का बसून लागलेलीं वेडं तितक्याच मायेच्या माणसाच्या दर्शनानं मात्र जातात; असा अनुभव आहे. पण यांचं तसं कुणीच जिवंत नाहीं ह्मणतां. आतां फक्त एक ईश्वरी कृपा ! ती जर झाली, तर काय होणार नाहीं ?

[ पद. राग—यमन. ताल—त्रिवट. ]

असामान्य रचना । प्रभु दावुनि करि शास्त्रकारमति मंदा ॥ धृ० ॥ करित रमणि पाषाणा चरणें । स्मरणें साग-रांत तरवि शिला ॥ १ ॥

लके०—ईश्वर !—हमीर ! आमचा कांहीं देवावर विश्वास नाहीं. आह्मी अगदीं नास्तिक आहोंत.

हमी०—तरीच मी मघांपासून पाहतों आहें, या दिवाणखान्यांत देवाची एकसुद्धां तसबीर कशी नाहीं ? हेंच याचं कारण ! पण काय हो सारंग !—सारंग तूर्त भानावर नाहींत. बरं—काय हो ! इथं शिवाजी महाराज, लोकमान्य, महात्माजी कुणाही देशभक्ताची तसबीर नाहीं हें कसं ?

लके०—यांत कांहींच आश्चर्य नाहीं. आमचे बाबा पोलिस सुपरिं-टेंडंट होते! हल्लीं सरकारचं पेन्शन खात आहेत–यांत सगळं कांहीं आलं!

हमी०—मग बरोबर! कमालीची राजनिष्ठा दिसते.

लके०—आमच्या घरांत पहिले खादीवाले आपणच आलांत!

हमी०—मग आपल्याला स्नान नाहीं ना करावं लागणार वडिलांना कळल्यावर सारंग?

सारं०—(दचकून) काय?

हमी०—ह्मटलं, माझी जायची वेळ झाली.

सारं०—होय का?

लके०—त्या फोटोवर फारसं लक्ष्य लागलं आहे तुमचं हमीर?

हमी०—फोटो फार छान आहे! शेड–लाइटची मजा आहे! आर्टि-स्टिक आहे.

लके०—आपल्याला हवा का तो?

हमी०—द्याल तर मेहरबानी होईल. कारण आपण बहिणभाऊ दोघंहि आहांत त्यांत. आजच्या प्रथम भेटीची स्मृति ह्मणून—

लके०—मग घ्या. पण आपला मिळाला पाहिजे हो एक.

हमी०—माझ्या इथं या आणि वाटेल तो उचलून न्या. फोटो न्या, बस्ट न्या, किंवा ऑईलपेंटिंग उचला. आपला हक आहे. बरं, येऊं आतां?

लके०—या. आह्मीं येऊं एक दिवस आपल्या इथं.

हमी०—सारंग, पोंचवायला यायचे श्रम नका घेऊं. तुमची तब्येत बरी नाहीं.

सारं०—बरी नसायला काय झालं? तें रोजचंच आहे. अहो, हा संसार आहे. तुह्मांला अजून अनुभव नाहीं. चला—

हमी०—लकेरी–काय ह्मणूं? ताई ह्मणूं का?

लके०—नुसतं लकेरीच ह्मणा–ताई नाहीं ह्मणायचं!

सारं०—हुकूम शिरसा वंद्य! हमीर! समजलांत ना?

हमी०—समजलों. पण आपण नका येऊं खालीं. सारंग ! तुम्ही नाहींच ऐकायचेत. ( लकेरीस ) तुम्ही याल तर माझ्या गळ्याची शपथ आहे.

लके०—शपथच घातलीत, नाहीं तर-( सारंग व हमीर जातात. ) ( स्वगत ) प्रेमाचं खरं स्वरूप आजपर्यंत मी प्रत्यक्ष पाहिलं नव्हतं ! चित्रांत-काव्यांत-नाटकांत आतांपर्यंत मी पहात होतें, तें प्रेमाचं प्रतिबिंबच ! आज मीं प्रेमलोकांत पाऊल ठेवलं-आज मी प्रेमाच्या सन्मुख उभी राहिलें-आज मी प्रेमाच्या नेत्रांत वाहूं लागलें. आज मी प्रेमाच्या हृदयाशीं बोलूं लागलें ! माझ्याभोंवतीं प्रेमाचं वातावरण भरलं आहे. सगळीकडे प्रेम-प्रेम-प्रेम ! प्रेमाचं संगीत चाललं आहे !

[ पद. राग-पहाडी, ताल-कवाली. ]

नाचत रसा रसिका । छुम छुम जलिं नौका ॥ धृ० ॥
प्रणयमहोत्सवीं । ललित रागिणी । मिरवित प्रीति-
पताका । उधळित मृदु कलिका ॥ १ ॥

सारं०—( प्रवेश करून ) ताई, कसे काय आहेत हमीर ?

लके०—दादा, मी तुझ्या पायां पडतें-तुझी क्षमा मागतें. माझी चुकी झाली. आपण आज संध्याकाळीं फिरून येतांना हमीरांच्या बंगल्यांत जायचं. येशील ना ?

सारं०—कशाला ? काय जाऊन करायचं आहे आज ? जाऊं केव्हां तरीं परवां तेरवां.

लके०—परवां तेरवां ? इतक्या उशिरां ? छेः आजच जायचं ! चल ना दादा आजच ! चल ना !

सारं०—अग पण हो. आतांच नाहीं ना निघून मोटारींत बसायचं ? बरं जाऊं संध्याकाळीं ! मला नाहीं वाटलं तूं इतकी उतावळी होशील—

लके०—मी उतावळी झालें का ? लबाड कुठला ! अग बाई ! कोण आलं ?

( रावसाहेब दरबारी व सोरट येतात. )

दर०—मि. सोरट! ही पहा माझी मुलगी! आहे ना पसंत? विचार करायला नको–होय ह्मणायचं नुसतं! हाच वाङ्निश्चय!–ठरलं लग्न!

लके०—लग्न! माझं लग्न! अग आई!

सोर०—(रडक्या स्वरांत) ठरलं. मुलगा पाहून अत्यंत आनंद झाला आहे. अशी नक्षत्रासारखी मुलगी मिळाल्यावर कोण लग्न करणार नाहीं!

लके०—हें काय? दादा! हें काय?

सारं०—ताई! घाबरूं नकोस! स्वस्थ बैस.

दर०—सारंग! सोरठसाहेबांना आपली लकेरी द्यायची ठरलं बरं. हे चांगले सुशिक्षित आहेत. मराठी चार पांच इयत्ता झालेल्या आहेत यांच्या. फार देशाभिमानी आहेत. ह्मणून परकीय भाषा शिकले नाहींत. अजून गरिबी होती. पण नुकतेच यांचे चुलते वारले त्यांची पंचवीस लाखांची प्रॉपर्टी यांना मिळाली.

सोर०—(रडक्या स्वरांत) मला पंचवीस लाखांची प्रॉपर्टी मिळाली.

दर०—हें पहा सोरटसाहेब, आमचं कुटुंब ह्मणजे आमच्या लकेरीची आई चार वर्षांपूर्वी वारली!

सोर०—( हंसून ) काय यांची आई वारली? हंः हः हः! फार वाईट झालं! हंः हः हः!

लके०—( स्वगत ) हा मनुष्य तरी काय आहे? हंसायचं तेव्हां रडतो आणि रडायचं तेव्हां हंसतो!

सारं०—बाबा, ताईच्या लग्नाची एवढी घाई कां? सावकाश चांगलं स्थळ पाहूं आणि करूं लग्न!

दर०—( हळूच ) तुला समजत नाहीं. अगदीं बेअकल आहेस. याच्यापेक्षां कुठलं चांगलं स्थळ? हुंडापांडा मुळींच नाहीं. पंचवीस लाखांची इस्टेट! आणि हा वेडा, तेव्हां कारभार मीच पहाणार आहें. काय सोरटसाहेब! कारभार आपण स्वतःच पहाणार ना?

सोर०—( रडक्या स्वरांत ) छेः छेः छेः ! असं कसं ? आपलं काय ठरलंयू, आपण पाहायचा म्हणून ना ?

दर०—ठरलं. मी तुमचा कारभार बरोबर पहातों. काय सारंग, कसं आहे स्थळ ?

सारं०—( रडक्या स्वरांत ) फार उत्तम आहे.

दर०—गाढव कुठला !

सारं०—हः हः हः हः ! मी गाढव, मी गाढव !

दर०—मूर्ख ! अक्कलशून्य ! पाजी ! सोरटसाहेब, आमच्या सारंगाचा स्क्रू जरा ढिला आहे. याच्या बायकोचंही डोकं फिरलंयू ! वेड लागलंयू तिला.

सोर०—( हंसत ) यांच्या बायकोला वेड लागलंय् ? अरे ! अरे ! कां, वेड कां लागलं ?

दर०—तिचे आईबाप एकदम इन्फ्लुएन्झांत मेले.

सोर०—( हंसत ) आईबाप मेले ? हंः हः हः हः !

दर०—आणि दोन भाऊ होते तेही वारले ?

सोर०—( हंसत ) भाऊही वारले ? कसे हो वारले ?

दर०—इन्फ्लुएन्झानंच ! त्या वर्षींचा इन्फ्लुएन्झा म्हणजे यमाजी-भास्करांनीं चालवलेली धरपकड ! दडपशाहीच ती ! घरंच्या घरं ओस पडलीं ! कुटुंबांच्या कुटुंबं नाहींशीं झालीं ! प्रेत न्यायला कुणी मिळायची मारामार ! सारंगचे सासुसासरे वारले. माझी तारांबळ उडाली ! मद्रासभर फिरलों, कसे तरी चार मुडदेफरास मिळविले आणि प्रेतं स्मशानांत नेऊन अग्नि दिला ! घरीं परत येतों तर मुलं वारलीं ! दोन मुलं ! कशीं नक्षत्रासारखीं मुलं ! आठवण झाली, कीं अजून हुंदका येतो ! तडफडून मेलीं हो ! माणूस मिळेना. मग काय करायचं ? टाकलं खांद्या-वर एक एक प्रेत आणि ठेवलं चितेवर ! या, या—हातांनीं ठेवलं हो ! काय वाटलं त्या वेळीं मनाला ! आठवण सुद्धां नको ! ( वरील भाषण चालू असतां मधून मधून सोरट ' अरे, अरे !' करून हंसतो. )

सोर०—( हंसत ) आणि ह्मणूनच यांची बायको वेडी झाली ! हः हः हः!

सारं०—( वेडावून ) हः हः हः हः ! हः हः हःहः ! हःहः हःहः !!

दूर०—सारंग ! चावटपणा बस्स कर.—सोरटसाहेब, चला आपण दिवाणखान्यांत जाऊं. लग्नांत काय काय करायचं, त्याच्या नक्की याद्या करूं. चला.

सोर०—चला. ( रडक्या स्वरांत ) येतों बरं मंडळी.

सारं०—( रडक्या स्वरांत ) या बरं. ( सोरट व रावसाहेब दरबारी जातात. ) ( स्वगत ) हा बाप आहे का—मला शब्दच सुचत नाहीं. विनोदाचा कडेलोट झाला, कीं करुणेंत त्याचा अंत होतो. आनंद–दुःख, आशा–निराशा यांच्या सरहद्दी एकच असतात का ?—अरेरे ! ही माझी ताई पहा ! झंजावातांत सांपडलेली ही फुलाची पाकळी ! खडकावर आदळलेली ही समुद्राची लहरी ! अरसिकांच्या समोर गायिलेली ही संगीताची लकेरी ! गाढवांच्या कानांशीं उच्चारलेली ही वेदाची ऋचा कशी हताश होऊन पडली आहे ! छेः ! इथं उभंच राहवत नाहीं !

[ जातो.

[ पडदा. ]

अंक पहिला समाप्त.

# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

[ स्थळ—रस्ता. अण्णा व बाळ येतात. ]

बाळ—अण्णा, मला भूक लागली आहे रे–फार भूक लागली आहे!

अण्णा—बाळ, तुला भूक लागली आहे आणि मला का लागली नाहीं ? पण करायचं काय ?

बाळ—करायचं काय ह्मणून विचार किती वेळ करायचा ? विचारांची इंडी शिजून भूक शमेल का ? भूकेला अन्नच पाहिजे, मग तें अगदीं कदान्न का असेना.

अण्णा—बाळ, 'भुकेला कोंडा आणि निजायला धोंडा' या ह्मणीचा आज दोन वर्षं आपण अनुभव घेतला नाहीं का ? कालच या फुटपाथवर आपण पांघरुणावांचून झोंपलों नव्हतों का ? आतां भुकेला कांहीं नाहीं–कोंडासुद्धां नाहीं.

बाळ—अण्णा, रडतोस काय असा ? तूंच रडूं लागलास ह्मणजे मग मी काय करूं ?–ते भिकारी बघ, जाणाऱ्या येणाऱ्या लोकांच्या पुढं, 'तात्या, तात्या' करून हात पसरताहेत आणि पोटाला मागताहेत. तसं आपण करूंया. चल.

अण्णा—बाळ, ते भीक मागताहेत! तशी आपण भीक का मागायची ? अरे, आपण भिकारी का आहोंत ?

बाळ—नाहीं तर काय श्रीमंत आहोंत ? पोटाला नाहीं ह्मणून उपाशीं मरतों आहोंत. भीक मागायची नाहीं तर काय करायचं ? अरे, भूक लागल्यावर भीक मागायला कसली लाज ? भूक लागली, कीं ब्रह्मांड आठवतं.

[ पद राग-तिलंग, ताल-त्रिवट. ]

**नस नस आटे । प्राण पिळवटे । नयनिं यमाचे बाहुटे ॥ धृ० ॥ मिळति न कांटे । पोटभर ते । जीवन देहाला विटे ॥ १ ॥ अनुभविं वाटे । देव भुरटे । ज्ञानहि खोटें । लटपटे ॥ २ ॥**

अण्णा—बाळ, दोन वर्षांपूर्वी आपण किती श्रीमंतींत लोळत होतों! तुला आठवण आहे का रे? बाबा, आई, अक्का आपले कसे लाड करीत असत! या मोटारगाड्यांमधून फिरत होतों! उंच उंच गाद्यांवर झोंपत होतों! गोड गोड पदार्थ मनमुराद खात होतों आणि राहिलेले फेंकून देत होतों!

बाळ—तें फेंकून दिलेलं तेवढं जरी आज खायला मिळतं तर वर्ष सहा महिन्यांची काळजी नव्हती!

अण्णा—तेव्हां फेंकून दिलेल्या अन्नानं आपल्याला शाप दिले, ते आज बाधत आहेत, म्हणून असे उपाशीं मरतों आहोंत.

बाळ—खरं रे बाबा! मला पूर्वीचं आठवत नाहीं, पण आपल्या अक्काच्या लग्नाची मला चांगली आठवण आहे. किती वऱ्हाड जमलं होतं रे! वरात केवढी थाटांत निघाली होती! गाड्या, घोडीं, मोटारीच्या रांगच्या रांग लागली होती! साहेबलोकांचा बेंडबाजा होता! आणि नळे, चंद्रज्योती नक्षत्रमाळा, दारूकाम किती उडालं असेल कुणाला ठाऊक!

अण्णा—हं! दारूकाम उडालं आणि पैशाचा धूर झाला! तो आतां आपल्या डोळ्यांना झोंबू लागला आहे. सगळ्या मद्रास शहरांत त्या वर्षी तेवढ्या थाटांत एकहि लग्न झालं नाहीं!

बाळ—मद्रास का काय तें मला स्मरत नाहीं, पण पुढं तापाची सांथ आली आणि बाबांना, आईला ताप येऊन तीं स्वर्गाला गेलीं! आणि कोणसासा एक आपल्यासारखाच श्रीमंत बुवा—आपणा दोघांना बरोबर घेऊन आगगाडींत बसला! आणि—आणि—पुढं—

अण्णा—आणि पुढं आपल्याला गाडींतच इन्फ्लुएन्झाचा ताप आला आणि आपण बेशुद्ध झालों !

बाळ—पण आपण कलकत्त्याच्या इस्पितळांत कसे गेलों ? आणि तो बुवा कुठं गेला ? आणि आज दोन वर्षांत त्यानं आपला तपास कसा केला नाहीं ?

अण्णा—देवाला माहित ! आपलीं खरीं नांवं–माझं भूपकल्याण आणि तुझं यमनकल्याण एकताले—पण इस्पितळांतल्या रोग्यांच्या यादींत पहातों तों आपलीं नांवं भलतींच ! माझं बेताल ढोलके आणि तुझं बेसुर मडके !

बाळ—अण्णा, मला वाटतं त्या बुवानं आपलीं नांवं बदलून आपल्याला इस्पितळांत टाकलं असावं आणि बाबांचा सगळा पैसाअडका लांबवला असावा !

अण्णा—ईश्वराला माहित ! पण आपण मद्रासला राहत होतों ते कलकत्त्यास गेलों आणि तापांतून बरे झाल्यावर त्या मायाळू म्हातारीनं आपल्या पोटाला घालून पोटच्या पोरांप्रमाणं आपला प्रतिपाळ केला ! पण बाळ ! मला वाटतं आपण कपाळकरंटेच आहोंत. नाहीं तर ती म्हातारी कां मरावी ?

बाळ—सांगूं ? मला वाटतं ती अर्धपोटीं राहून आपल्याला संभाळीत होती ! पोटाला कसं मिळवावं याची काळजी आतांपर्यंत तिनं आपल्याला पडूं दिली नाहीं. पण आज, आतां–अण्णा ! भूक लागली रे !

अण्णा—आपल्याला अक्काचा तरी तेवढा पत्ता लागता तर? पण–तिच्या नवऱ्याचं नांव गांव कांहीं माहित नाहीं मला ! मद्रासला असतों तर कुणी सांगितलं असतं. पण कुठं मद्रास, कुठं कलकत्ता, आणि कुठं ही मुंबई ? इथं आपण अक्काचा शोध करूंया !

बाळ—पण शोध कसा करायचा ? 'आमची अक्का आहे का ? अक्का आहे का ?' म्हणून घरोघर चौकशी करीत हिंडायचं ? इथं एकएक

चाल पहा केवढी! एकदां आंत शिरलों, कीं बाहेर पडायला महिना लागायचा!

अण्णा—शिवाय एवढ्या अफाट शहरांत पत्ता लागायला किती दिवस लागतील देवाला माहित!

बाळ—देवाला सगळंच माहित! तुझं आपलं जेव्हां तेव्हां ‘देवाला माहित!’ देवाला माहित असेल, पण तो आह्मांला सांगतो आहे का कांहीं माहिती? पोटांत कावळे ओरडताहेत, अन्न कसं मिळवावं सांगतोय् का? नाहीं ना? मी तर आतां भीक मागणार! ते पहा, लोक येताहेत. जातों–मागतों त्यांच्यापाशीं दिडकी दिडकी!

अण्णा—बाळ! नको मागूं! कुणाहीपुढं हात पसरूं नकोस! आपण कुणाचीं मुलं, तेंही कुणाला सांगूं नकोस! त्यापेक्षां देवाचं भजन करीत बसूंया. पोटाच्या चिंतनांत रहाण्यापेक्षां—

बाळ—अरे, आधीं पोटोबा आणि मग विठोबा! मी भीक मागणार. (लोक जातात येतात त्यांच्यासमोर जाऊन) दादा! दादा! एक दिडकी द्या. नाहीं, हा गेलाच! शेटसाहेब! शेटसाहेब! पोटाला–नाहीं! हाही गेला! हो, भटजी महाराज आले–भटजी महाराज! उपाशीं आहें बघा. द्या कांहीं तरी–नाहीं. (एक बूटपाटलोणवाला येतो.) हे एक आले–साहेब! साहेब! एक दिडकी—

गृह०—ही घे लाथ. (लाथ मारून निघून जातो. बाळ पडतो.)

अण्णा—(बाळाला उठवून) अरेरे! आधींच उपाशीं आणि त्यांत बुटाची लाथ? देवा! काय रे ही दशा? बाळ—ऊठ, ऊठ? दुसऱ्यापुढं हात पसरलास तें देवालासुद्धां आवडलं नाहीं. अरे, उपाशीं मरायचं नशिबीं असलं, तर देवाचं नांव गात उपाशीं मरूं.

बाळ—(रडत) पण अण्णा? भूक लागली रे? नाहीं सोसवत. आतां जीव कासावीस झाला. (बेशुद्ध पडतो.)

अण्णा—देवा! तुझ्यावांचून आमचा कुणावरही भार नाहीं रे; तूंच मार किंवा तार!

( भजन करीत बसतो. निरनिराळ्या जातीचे, दक्षिणी, गुजराथी, पारशी गृहस्थ व स्त्रिया येतात व सभोंवतीं उभीं राहतात. गर्दी जमते. पद झाल्यावर लोक पैसे टाकतात व जातात. सर्व गेल्यावर पैसे गोळा करून) बाळ, देवाचं नांव घेतलं, भक्तिभावानं भजन केलं त्याचं हें फळ ! देवा, तुझे उपकार आहेत रे बाबा !

बाळ—अण्णा, हे पैसे देवानं दिले असले तरी ते तुझ्या कमाईचे –तुझ्या गुणावर–तुझ्या गोड गाण्यावर ते मिळालेले आहेत. चल, आपण कांहीं तरी खायला घेऊं.

अण्णा—( पैसे मोजून ) दोन रुपये आहेत बघ. सहज चार आठ दिवस जातील याच्यावर. चल. चल, त्या दुकानांत जाऊन कांहीं तरी खाऊं अगोदर ! [ जातात.

---

## प्रवेश दुसरा.

[ स्थळ—लकेरीची खोली. ]

लके०—( स्वगत ) आई, आई ! तूं कुठं ग आहेस ? आतांपर्यंत मला तुझी आठवण झाली नाहीं ह्मणून रागावलीस काय ? पण खरंच सांगतें, बाबांनीं ह्या काळपर्यंत माझं कांहीं कमी पडूं दिलं नाहीं. माझं शिक्षण पुरं केलं ! माझी सारी हौस पुरविली ! पण आतां–आतां काय ? आई ! मरणसमयीं तूं माझं मुख कुरवाळून माझ्या मस्तकावर हात ठेवलास आणि "माझी पोर भाग्याची आहे, पोरी ! तुला मनाजोगा पति मिळेल," असा मला आशीर्वाद दिलास ! त्या आशीर्वादाच्या पायावर माझ्या मनानं गगनचुंबित मनोरा उभारला ! त्या मनोऱ्याच्या मखरांत मीं ह्मीरांच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा केली ! पण इतक्यांत दुर्दैवाची वीज कडाडली ! बाबांची बुद्धि भ्रष्ट झाली ! माझ्या मनोरथाचे तुकडे झाले ! प्रेमाचा चंडोल आशेच्या आकाशांत प्रीतीचं गीत गात गिरक्या घेत होता, तो निराशेच्या खडकावर तडफडत पडला ! आशेचा देवदूत अमृताचं सिंचन करून

त्याला जिवंत करीत आहे तर निराशेची नागीण आपल्या जहरी दंशाचा मारा करून त्याचा जीव हिरावून नेत आहे ! आई ! मी आतां काय ग करूं ?

[ पद राग-जंगला ताल-०वाली. ]

मम भालिलिखितीं विलापकथा । तिळभर ना आशा स्मशानगतां ॥ धृ० ॥ उसळत मारुत । नौका भ्रमते । विधिताता कां गांजितां ही हताश सुता ॥ १ ॥

( स्फुंदत रडते. सारंग एक झांकलेलें पार्सल आणतो. )

सारं०—ताई ! हें काय ? वा: ! हें काय रडुबाईसारखं ? हुं: हुं: हुं: हुं: ( रडण्याचें वेडावणें दाखवितो. )

लके०—दादा ! हें रे काय असं ?

सारं०— ( रडत ) कांहीं नाहीं तुला रडतांना पाहून मला हसूं येतं, तेव्हां मी हंसतों. हुं: हुं: हुं: हुं: !

लके०—चल, दादा ! या वेळीं सुद्धां तुला असला चावटपणा सुचतो ना !

सारं०—या वेळीं सुद्धां ह्मणजे ? ही वेळ ह्मणजे काय दुनयेवेगळी आहे कीं काय ? ज्या वेळीं जी गोष्ट करायला कुणालाही सुचणार नाहीं ती नेमकीच मला करायला सुचते ! ताई ! तुला माहित नाहीं. लोक रडतील तेव्हां हंसावं, आणि लोक हंसतील तेव्हां रडावं. पण हें बघ, मी तुला भेट आणली आहे. याचं नांव "शठंप्रति शाठ्यं !" हं, हात नाहीं लावायचा. दुरून पहायचं. अगोदर नीट मांडामांडी तर करूं दे. हें टेबल, असं मधोमध ठेवायचं ! आतां त्याच्यावर ही चीज अशी ठेवायची. नंतर ताई, तूं असं समोर उभं रहायचं ! हं ठीक. आतां सेना फत्त खेल —मोडकी समशेर—नवाब बडबडतुल्ला—सारंगसाहेब ! करायचा ओपनिंग सेरिमनी ! ( कव्हर काढतो. हमीराचा संगमरवरी बस्ट दिसतो. )

लके०—हमीर ! हमीरच ! दादा, हे हमीरच ! ( हळूहळू जवळ जाते. )

सारं०—हां, हां, हां. संभाळ. दगडी पुतळा आहे हो. नाहीं तर तुला वाटेल—



लकेरी—हमीर ! हमीरच ! दादा, हे हमीरच ! ( पान २६. )

Photo by M. N. Kirtikar, Bombay.] [Blocks by Manoranjan Press, Bombay.

लके०—काय मला वाटेल ? चावट—

सारं०—चावट ह्मणशील मला, तर आतां बाबांना सांगेन हं !

लके०—खरंच दादा ! हा पुतळा अगोदर इथून उचल. माझ्या खोलींत हमीरांचा पुतळा जर बाबांनीं पाहिला—

सारं०—तर काय होईल ? बरोबर न्याय होईल ! ‘ शठं प्रति शाठ्यम्’ जशास तसं ! ताई, आपला तर तुला सल्ला आहे, कीं बाबांशीं ‘ शठं प्रति शाठ्यम् ’ या तत्त्वानं तूं वाग. जें जें त्यांनां आवडणार नाहीं तें तें करायचं ! जातील चिडून ! जाईनात. तूं कांहीं आतां लहान नाहींस. मेजर आहेस–अर्थात् स्वतंत्र आहेस. लग्नाच्या घटकेपर्यंत कांहीं बोलूं नकोस. सावधानाच्या अक्षता पडायच्या वेळीं कर खरं स्वरूप प्रगट आणि दाखव कायदा. ‘ शठंप्रति शाठ्यम्. ’ या विंचवाची नांगी अशी टेंचली पाहिजे.

लके०—दादा ! बाबांनीं आपली माया झुगारून दिली तरी त्यांच्याशीं आपण असं वागणं चांगलं का ? त्यापेक्षां आज त्यांना मी लग्न करीत नाहीं ह्मणून सांगणं बरं नाहीं का ? बाबा‘शठं’ झाले तरी ‘शठं प्रति सत्यम्’ आपण आपलं खरेपणानंच वागावं; मग काय व्हायचं असेल तें होईल.

सारं०—तूं पोलीस पेन्शनराची मुलगी शोभत नाहींस. गांधींची अनुयायी वाटतेस. आमचं मत नाहींच तुला पटायचं. न पटूं दे. तुझी मर्जी.

लके०—पण अगोदर हा पुतळा तूं आपल्या रूममध्यें घेऊन जा. इतक्यांत जर बाबा आले तर—

सारं०—तर ? तर काय ?

लके०—तर काय ? ते माझ्या ‘शठंप्रति सत्यम्’ प्रमाणं वागणार नाहींतच, पण तुझं ‘शठंप्रति शाठ्यम्’ ही ते विचारांत घेणार नाहींत. हातां-तल्या काठीनं ‘शठं प्रति लाठ्यम्’ किंवा काठ्यम् मात्र करतील ! दादा, हसूं नकोस–ते बाबा आहेत बरं–खरंच तसं करतील ! आणि मग हा सुंदर पुतळा भंगून जाईल.

सारं०---भंगून जाईल! बोलली! भंगून जाईल तर! भंगून जायला हा काय सोरटी सोमनाथ आहे? ताई, हमीरांची मूर्ति मी इथं आणली ती भंगून जाण्याकरितां नव्हे! तुझ्या खोलींत तिची मीं मुद्दाम स्थापना केली, ती बाबांनीं तिचे तुकडे करण्याकरितांहि नव्हे! तर या घरांत मानानं तिची पूजा होण्याकरितां! हमीर माझे मित्र म्हणून नाहीं-तर माझे मेहुणे-माझ्या ताईचे-हुं-म्हणून! बरं, मी त्या सोरटचा समाचार घ्यायला जातों.

[ सारंग जातो.

लकें०---( स्वगत ) दादा, तूं सोरटाचा समाचार घे, मी इकडे या स्वारीचा समाचार घेतें. पण बाई, यांचा समाचार तरी कसा घ्यावा?—हमीर! माझ्या श्वासोच्छ्वासाचं अभ्यंगस्नान मी आपल्याला घालूं का? ही करपल्लवाची पुष्पमाला मी आपल्या कंठांत घालूं का? हीं नेत्रांचीं निरांजनं मी आपल्या मुखांवरून ओवाळूं का? या साखरचुंब्याचा गोड नैवेद्य मी आपल्याला अर्पण करूं का?—कां बोलायचं नाहीं वाटतं आमच्याशीं? हं, आतां समजलें. विचारपुस करायला वेळ लागला म्हणून रागावली आहे स्वारी! का मी त्या माकडाशीं लग्न लावीन या संशय-पिशाचानं पछाडलं आहे स्वारीला? पण आपल्याला असं वाटलं तरी कसं? अद्यापि मी तसं आपल्याजवळ बोललें नाहीं इतकंच ना?—चुकलें-आज बोलतें-याच गळ्याची शपथ घेऊन सांगतें, कीं ही लकेरी आपल्या-वांचून दुसऱ्या कुणाशींही लग्न करणार नाहीं! आतां बाबांना येऊं द्या, आपल्या समक्ष त्यांना निक्षून सांगतें—

[ पद राग-धानी. ताल-त्रिवट. ]

मान्य कांत वरिला हा। रवि राज्य करित। मम मनिं
निशिदिनिं तो हा ॥ध्रु०॥ धन्य हंसिका। मौक्तिक वांछित।
खुलवि फुलवि शशि तारका ॥ १ ॥

—आतां झालं ना? आतां बोला गडे! ( गळ्याला मिठी मारून ) असं काय गडे करायचं? किती वेळ हा रुसवा धरायचा? ( चुंबन घेऊन ) बोलायचं ना! बोलायचं ना!—नाहीं बोलत? आपण बोलेपर्यंत मी

आपल्याला सोडायची नाहीं. अशी या हृदयावर डोकं ठेवून पडेन. (डोळे मिटून हमीराच्या मूर्तीच्या गळयाला मिठी मारून पडते–इतक्यांत दरबारी येतो.)

दर०—वाः! वाः! चांगला उद्योग आरंभला आहेस! तरी ह्मटलं त्या हरामखोर हमीराचं आमच्या घरांत एवढं प्रस्थ कां? हें त्याचं कारण! आईबापांच्या वेचाळीस कुळया रवरव नरकांत घालायच्या आहेत वाटतं कारटे!

लके०—पण असं झालं तरी काय बाबा?

दर०—झालं तरी काय? सोरटसाहेबांशीं तुझं लग्न व्हायचं ठरलं, लग्नतिथि पंधरवड्यावर आली, आणि तूं एखाद्या बाजारबसवीसारखी या दगडाच्या हमीराचे मुके घेतेस? त्याला उराशीं घट्ट आंवळून धरतेस? लंकेसारखी तूं एखादी वेडी असतीस किंवा एखादी निर्बुद्ध अशिक्षित मुलगी असतीस—

लके०—खरंच, मी जर एखादी आठ वर्षांची अडाणी मुलगी असतें तर बाबा–तुह्मी सांगाल त्या फडक्याच्या पुतळयाशीं सुद्धां लग्नाला तयार झालें असत्यें.

दर०—ह्मणजे सोरटसाहेबांशीं लग्न करायला तूं तयार नाहींस, असंच कीं नाहीं? वडिलांची अशी अवज्ञा करणं तुझ्यासारख्या बी. ए. झालेल्या मुलीला शोभत नाहीं.

लके०—आणि मुलीला बी. ए. करून नंतर एखाद्या बेअकली नंदीबैलाची पट्टराणी हो ह्मणून तिला हुकूम करणं आपल्या वडिलपणाला तरी शोभतं का?

दर०—मला उलटून बोलतेस का? कारटे! ही त्या हमीराची शिकवण. माझ्या नांदत्या घराचं त्यानं स्मशान बनवलं आहे, आणि तुमच्या हातांत असहकाराचीं कोलितं देऊन भुताप्रमाणं तो वेताळ तुम्हांला नाचवतो आहे. तुला तर कसलाही ताळतंत्र राहिला नाहीं. मी मायबाप सरकाराचं अन्न खातों आहें, आणि माझ्या घरांत

खादीचीं पातळं नेसून राजद्रोहाचं प्रदर्शन करायला तुला लाज नाहीं वाटत ? तो कार्टाही तसाच ! अलिकडे पाहतों तर सुतक्यासारखी एक खादीची टोपी पैरण घालतो आणि जातो गांव उंडगायला ! परवां सहज म्हटलं 'अरे, असा कैद्यासारखा काय पेहराव केलास ?' तर म्हणतो कसं, 'आम्ही हिंदुस्तानचे लोक परतंत्र अर्थात् कैदीच आहोंत. कैद्यांनीं कैद्याचे कपडे करायचे नाहींत तर काय साहेबाचे करायचे ?"—अरे चोरा !—

लके०—मग तो काय खोटं बोलला ? खरं तेंच बोलला. जोंपर्यंत आम्ही गुलामगिरींत आहोंत तोंपर्यंत महात्माजी सांगतात तसा खादीचा पोशाखच आम्ही वापरायला हवा. काटकसरीच्या तत्त्वावर सरकारी नोकरांनीं सुद्धां खादी वापरायला काय हरकत आहे ? खादीला सरकारचा मुळींच प्रत्यवाय नाहीं. एक खादीची सद्रा टोपी करा ना बाबा तुम्हीही.

दर०—करतों, करतों हो ! खादीचं व्याख्यान देते आहे कारटी मला ! मी सांगतों खादी राजद्रोही आहे, हमीर अराजक आहे. आजपासून तूं खादी नेसतां कामा नये, हमीराची भेट घेतां कामा नये, आणि माझ्या हुकमावांचून घराच्या बाहेर पाऊल टाकतां कामा नये. काय—करणार कीं नाहीं असं ? बोलत कां नाहींस ?—दांतखिळी का बसली तुझी ?

लके०—होय. आपल्या मतामधली ही सुसंगतता पाहून माझी दांतखिळीच बसली ! तुम्हीं समाजसुधारक म्हणून मिरवलांत ! स्त्रीशिक्षणाचे पुरस्कर्ते म्हणून टिमकी वाजवलीत ! स्वतंत्रतेचे भोक्ते म्हणून नगारा पिटलात ! आणि आज तुमच्या स्वतःच्या मुलीला तिच्या मर्जीप्रमाणं पति निवडण्याला बंदी करून एखाद्या रानटी माणसाप्रमाणं तिला धरून बांधून एका अशिक्षित गांवढळाशीं लग्न लावतां ? काय म्हणावं तुम्हांला ! बाबा, तुम्हीं मला इतकं शिक्षण तरी कां दिलंत ?

दर०—तुला अशी बेफामपणानं वागण्याकरितां नाहीं दिलं. मी इन्स्पेक्टर असतांना माझ्या वरिष्ठसाहेबांनीं मला सांगितलं, कीं 'तूं आपल्या मुलीला बी. ए. कर.' मीं 'होय साहेब' म्हटलं. तो माझा शब्द खोटा होऊं नये म्हणून मीं तुला इतकी शिकवून बी. ए. केली !



दरबारी—अग, काय सांगूं तुला? केवढा–केवढा श्रीमंत!
लकेरी—आणि केवढा मूर्ख!

( पान ३१. )

Photos by M N. Kirtikar, Bombay.] [Blocks by Manoranjan Press, Bombay.

लके०—आणि 'मुलीला बी. ए. केलीस, कीं एखाद्या अडाणी माकडाशीं तिचं लग्न कर' असं त्याच साहेबांनीं सांगून ठेवलं होतं वाटतं!

दर०—हो हो—गप्प बैस—साहेब का माझा काका, मामा आहे म्हणून हरएक बाबतींत मी त्याचं ऐकेन ? हा प्रश्न माझा आहे. तुला काय, मी सांगेन त्याच्याशीं लग्नाला उभं रहायचं. वेडी पोर !

[ पद राग—मुलतानी. ताल—एका. ]

अवदशा खचित तव मनसदन येत । करित घात । कुटिल डंकिनी । पतिसुख इंधनिं । नरकवास जनिं । तात-माय ऋणां तुडवि ॥ धृ० ॥ पुरविन कौतुक हौस आस । वचन खास हें परिस । जगीं तुजविण न मज कुणि । प्रिय सौख्यराशि ॥ १ ॥

अग, पैशामध्यें काय जादू आहे, केवढं सामर्थ्य आहे, हें तूं जाणत नाहींस. पतीची पत पैशावर पारखावी ! सोरटसाहेबांसारखा नवरा शोधून सांपडायचा नाहीं. अग काय सांगूं तुला ! केवढा—केवढा श्रीमंत !

लके०—आणि केवढा मूर्ख ! श्रीमंत आणि मूर्ख ! बाबा, एकट्या श्रीमंतीची किंवा एकट्या मूर्खपणाची आपल्याला मोठीशी किंमत नव्हती. पण श्रीमंत आणि मूर्ख यांचं हें एकीकरण आपल्या लोभी मनाला लोह-चुंबकापेक्षांहि जोरानं ओढीत असेल नाहीं ? असल्या दुर्मिळ स्थळासाठीं किती काळ बकध्यान धरून बसलां होतां बाबा ? हें ठिकाण माझ्यापेक्षां आपल्या पत्रिकेशींच जास्त जमत असेल नाहीं ? बाबा, मी या आईच्या तसबिरीला साक्षी ठेवून आपल्याला स्पष्ट सांगतें, कीं मी त्या सोरटी-सोमनाथाशीं मुळींच लग्न करणार नाहीं. कारण त्याच्यावर माझं प्रेमच बसत नाहीं.

दर०—अग, पण प्रेम नसलं तर नसलं ! लग्न लावायला तुला काय हरकत आहे ? नुसतं लग्न लाव आणि प्रेमाचा धिंगाणा घालीत बैस तुला वाटेल त्याच्याशीं !

लके०—आई! ऐक–ऐक–हीं बाबांच्या तोंडचीं मुक्ताफळं ऐक! पैशाच्या प्रेमाला लालचावलेलं हें पिशाच पोटच्या पोरीला पापाची पायवाट कशी दाखवून देत आहे तें तूंच पहा! आई, असल्या सैतानी पतीशीं एकनिष्ठ राहतांना तुला भयंकर दिव्यांतून जावं लागलं असेल! पण त्या यमयातना सोसूनसुद्धां तूं आपल्या पातिव्रत्याची पताका फडकावीत परलोकची पायरी चढलीस! आई! तुझी खरी योग्यता आज मला कळली! पित्याचं नातं पवित्रपणानं पाळण्याइतका बाबांच्यापाशीं पुण्यसंचय नाहीं. स्वतःच्या पावित्र्याकरितां मी पित्राज्ञा झुगारून देतें;—लौकिकाचं गांठोडं गुंडाळून ठेवतें, स्त्रीविनयाचं वैभव दूर सारतें, आणि पतिव्रतेचं उग्र स्वरूप प्रगट करतें, म्हणून माझ्यावर रागावूं नकोस. या वेळीं मी तुझ्यावांचून कुणाला ग हांक मारूं?

[ पद. गझल. ताल–कवाली. ]

तातकरीं दुहिताविनाश। बल द्याया वेगें। माते धांव गे ॥ धृ० ॥ अर्पुनि म्लान मुखीं। चुंबनधारा। घे हृदयीं फुलवीं जिवाला। तव माया वेगें। माते धांव गे ॥ १ ॥

दर०—तुझं हें रडगाणं स्वर्गांत तिच्या कानीं जाऊन तुझ्या हांकेला ती थोडीच धांवून येणार आहे?

लके०—स्वर्गलोकीं आत्मसमाधींत निमग्न झालेला माझ्या मातेचा आत्मा मूर्त स्वरूपांत जरी या भूलोकीं उतरला नाहीं तरी तो आपल्या पुण्याईचं बळ आपल्या लाडक्या मुलीच्या मदतीला पाठविल्यावांचून राहणार नाहीं. आई! हे हमीर पहा, सद्गुणाचे सागर–समाधानाचं आगर–सरस्वतीचं माहेरघर–माझ्या प्रेमाचे परमेश्वर हे आहेत! यांच्या या मूर्तीसमक्ष—आई! तुझे पाय साक्षी ठेवून मी प्रतिज्ञा करतें, कीं हमीरांवांचून मी कुणालाही वरणार नाहीं!

दर०—नाहीं–नाहीं—मी तुझं सोरटाशींच लग्न लावणार!—तुझ्या मर्जीविरूद्ध लावणार–जबरदस्तीनं लावणार? मी रिटायर्ड पोलीस सुपरिंटेंडंट आहें. तूं अजून मला ओळखलं नाहींस.

लके०—मग आपणहि अजून मला ओळखलं नाहीं. सोरटाशीं मी साफ लग्न करीत नाहीं. (हँडबॅगमध्यें एक खादीचें पातळ व पोलकें भरते व मनीबॅग हातांत घेते.)

दर०—हें काय करते आहेस ?

लके०—मला वाटेल तें. मी स्वतंत्र आहें. चाहिल तें करीन. वाटेल तिकडे जाईन. ही तुमची मुलगी लकेरी नव्हे–चवताळलेली वाघीण आहे. माझ्या वाटेला जाऊं नका.

दर०—ह्यः ह्यः ह्यः! वाघीण कितीही चवताळली तरी तिला पिंजऱ्यांत पकडायची कला मला चांगली अवगत आहे. थांब; आतां तुला कोंडून ठेवतों बघ.

लके०—या वाघिणीला कोंडून ठेवायचा परिणाम 'पिनलकोड' तुह्मांला पटवून देईल, समजलांत का रिटायर्ड पोलिस सुपरिंटेंडंटसाहेब ! (हातांतलीं कांकणें व गळ्यांतील दागिने त्याच्या पुढ्यांत फेंकून देऊन ) हे घ्या आपले दागिने! तुमचा काय नेम? चोरीचं वारंट काढायला सुद्धां तुह्मी कमी करणार नाहीं. घ्या पाहून नीट! तुमच्या फुटक्या कवडीची मला जरूरी नाहीं. (मनीबॅग हालवून) हे पैसे माझे स्वतःचे आहेत. दादांनीं मला भाऊबीजेची ओंवाळणी घातली, त्यांपैकीं हे आहेत. हें खादीचं पातळ, त्यांतल्याच पैशांचं विकत घेतलं आहे. पाहिलंत? घेतलात झाडा पोलिससुपरिंटेंडंट साहेब? येतें.

दर०—कुठं चाललीस तूं? नाहीं जायचं. (अडवतो.)

लके०—नाहीं जायचं? तुह्मीं कोण मला अडवणार? सरा बाजूला एकदम. (दरबारी बाजूला सरतो व लकेरी जाते.)

दर०—अरे ही गेली! हिला सोडून कसं चालेल? ही तर माझं भांडवल! या भांडवलाच्या भिस्तीवर तर सोरटाचा सट्टा मीं केला आहे. ही थेट हमीराकडे जाणार! कुठं का जाईना! पाताळांत गेली तरी तिथून मी तिला परत आणीन. मी रिटायर्ड पोलिस सुपरिंटेंडंट आहें!

(पडदा.)

अंक दुसरा समाप्त.

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

[ स्थळ---दरबारीच्या बंगल्यासमोर, सारंग व सोरट समोरासमोर येतात. ]

सारं०---ओहो ! मि. सोरट ? गुड् मॉर्निंग ! मी आपल्याकडेसच निघालों होतों, तों आपणच इकडे आलांत ! बरं झालं.

सोर०---( रडत ) अहो, नुसतं बरं झालं काय ? छान झालं ! उत्तम झालं ! तुमच्या लकेरीताईकरितां असे नामी दागिने घेतले आहेत---असे नामी---तुम्हांला काय सांगूं ? पंचवीस हजार रुपये पडले ! केव्हां तुह्मांला दाखवीन असं झालं आहे. चला आंत---रावसाहेब, लकेरीताई, तुम्ही---सगळे एकदमच पहा.

सारं०---सगळे पहातीलच---मला तर पाहूं द्या अगोदर-एवढे पंचवीस हजारांचे दागिने ! आपण तर बापजन्मीं कधीं पाहिले नाहींत. पाहूं द्या कसले आहेत ते तरी.

सोर०---अहो, कसले ह्मणजे सोन्याचे !-मोत्यांचे !-हिऱ्यांचे !-नाणकांचे !-पाचेचे ! लख् लख् लख् लख् करताहेत नुसते !

सारं०---हं-हं ! दाखवा दाखवा पाहूं.

सोर०---( बॅग उघडून ) हे पहा, या आंगठ्या ! या माळा ! या बांगड्या ! हीं कांकणं ! कां हंसतांसे ?

सारं०---हंसूं नको तर काय रडूं ! अहो, कुठं घेतलेत हे दागिने ?

सोर०---कुठं ह्मणजे-आमच्या बंगल्यावर ! एक बडा जवाहिऱ्या आला आहे निजाम हैदराबादेहून. माझं नांव त्यानं तिथं ऐकलं. एवढ्या लांबून मुद्दाम आला तेव्हां खरेदी करायला नकोत ? काय, आहेत कीं नाहींत उत्तम ?

सारं०—फार उत्तम ! अहो, हे दागिने खोटे आहेत ! हीं मोतीं पहा कशीं पिचताहेत ? हें सोनं तरी कसलं ? हें मुलामा दिलेलं लोखंड आहे ! हे खडे पै किंमतीच्या कांचा आहेत !

सोर०—( हंसत ) असं ? हे दागिने सगळे खोटे ! अरे अरे अरे !

सारं—तुम्हांला त्या चोरानं फसवलं !

सोर०—( हंसत ) मला फसवलं ! इः इः इः इः !

सारं०—अहो, हंसता काय असे ?

सोर०—( हंसत ) अहो, हंसत नाहीं रडतोंय् मी फसलों म्हणून ! मी ठार बुडालों हो !

सारं०—तो भामटा गोल्डन गँगपैकीं असला पाहिजे.

सोर०—( हंसत ) असेल ! असेल ! आपण अगोदर रावसाहेबांना आणि तुमच्या ताईंना दाखवूंया हे.

सारं०—नको नको ! मुळींच दाखवूं नका ! तुह्मीं असे फसलांत ह्मणून बाबा रागावतील, आणि ताई तर तुमची टर उडवील. अहो, पंचवीस हजार रुपये देऊन पांच रुपड्यांचासुद्धां माल नाहीं तुमच्या पदरांत पडला !

सोर०—(हंसत ) असं नाहीं ! मग आतां करावं काय या दागिन्यांचं ?

सारं०—काय करावं ! एखाद्या नाटकमंडळीला टाका देऊन हे. त्यांच्या जोगते आहेत. टाका देऊन बक्षीस ! असा असा फसलों ह्मणून सांगूं नका हो त्यांना ! नाटकमंडळी आहे ती ! तुह्मांला आणखी बनवतील ! समजलां ? त्यांनां सांगा, कीं मुद्दाम तुमच्या कंपनीकरितां हे खरेदी केले. ठेऊन द्या. सगळं कसं ऐटींत बोला.

सोर०—( रडत ) अहो, पहा कसा ऐटींत बोलतों तें ! मी काय असा बावळा नाहीं. पण काय हो, पोलिसांत वर्दी देऊं का ?

सारं०—छेः छेः ! पोलिसांत वर्दी द्याल तर तुमची सगळ्या मुंबईंत छीः थुः होईल. उद्यां आमची ताईच लग्नाला उभी रहायाची नाहीं तसं झालं तर. अहो, अगोदरच प्रश्न निघाला आहे. तेवढ्याकरितां तर मी

आतां मुद्दाम निघालों होतों तुमच्याकडे–हें पहा, आमच्या ताईचं आणि तुमचं लग्न ठरलं ! पण प्रश्न असा आहे कीं, आमची ताई आहे बी. ए., आणि तुह्मांला येत नाहीं ए बी सी सुद्धां ! किती वाईट दिसतं ! तेव्हां बी. ए. ची उणीव कशी भरून काढावी ? काय करावं ? पडला प्रश्न ! लागलों डोकीं खाजवायला ! शेवटीं एखाद्या 'ऊ' सारखी आमच्या ताईच्या डोक्यांतून पटकन् निघाली युक्ति, कीं तुह्मीं विलायतेला जाऊन यावं.

सोर०—पण लग्न झाल्यावर जायचं ह्मणून रावसाहेबांनीं ठरवलंच आहे.

सारं०—छेः छेः छेः ! लग्न झाल्यावर नाहीं उपयोगी ! अगोदरच जायला हवं. ताईचा तसा आग्रहच आहे ह्मणाना. पहा बुवा–तिचा शब्द तुह्मांला मानायचा नसला तर माझं कांहीं जात नाहीं. ताई ह्मणाली, माझा शब्द ते मानतील.

सोर०—अर्थात् ! त्यांचा वाटेल तो शब्द मी थुंकीसारखा झेलून धरीन. त्या सांगत असल्या तर आतां निघतों. या घटकेला जातों.

सारं०—तुह्मी जालच, माझी खात्रीच आहे. विलायतेला गेल्यावांचून बी. ए. ची उणीव नाहीं यायची भरून.

सोर०—पण तिथं नुसतं जाऊन आलं कीं झालं ? परीक्षा बिरीक्षा नकोत द्यायला ?

सारं०—अहो, कसल्या परीक्षा, आणि कसलं काय ? तिथं गेल्यावर कांहीं तरी करायचं आणि ए, बी, सीपासून एक्स्, वाय्, झेडपर्यंत वाटेल तीं आणि वाटेल तितकीं अक्षरं नांवापुढं लावून द्यायचीं.

सोर०—मी सगळींच लावीन ! चालतील लावलीं तर ?

सारं०—कां नाहीं चालणार ? अहो, माझा एक स्नेही तिथं हमाली करतो. इथं आल्यावर एच्. एम्. एल्. लावायला लागला !

सोर०—इतकं सोपं आहे ह्मणतां ?

सारं०—अगदीं सोपं ! तुह्मांला बॅरिस्टर व्हायचं आहे का ? कांहीं करायचं नाहीं. या सखुबाईच्या, भागवताच्या खाणावळी आहेत नाहीं,



सोरट—( हंसत ) ही तुमची वायको वाटतं? अरे अरे! वेड लागलं! ( पान ३७.)

Photo by M, N. Kirtikar, Bombay. (Blocks by Manoranjan Press, Bombay.

तशा तिथं कांहीं माधवाश्रमासारख्या खानावळी आहेत. इन्स म्हणतात त्यांना. त्यांत वर्षांतले कांहीं ठराविक दिवस जेवायला गेलं कीं झालं ! सहासहा छत्तीस-छत्तीसपर्यंत जेवणं झालीं, कीं, त्याला करतात बॅरिस्टर !

सोर०—असं ? मग आतां जातों. पण जायला बोट ? म्हणजे मी म्हणतों राजापूर, देवगड, मालवण हीं बंदरं करीत एक बोट गोंव्याला जाते.

सारं—तें तुम्ही हमीरांना विचारा. ते विलायतेला जाऊन आलेले आहेत. तुम्हीं बाणकोट हरेश्वरावरून जायचं का आमच्या मामांच्या फुणगुस खाडींतून प्रवास करायचा हें ते बरोबर सांगतील. तुम्ही असेच्या असे जा त्यांच्याकडे. जलदी करा. तुम्हांला विलायतेला गेल्यावांचून गत्यंतर नाहीं. इथं तुम्हीं आजच्या दागिन्यांसारखे वारंवार फसाल. चला-हमीरांची भेट घ्या.

सोर०—( रडत ) नमस्कार ! येतों बरं.

सारं०—( रडत ) या बरं. ! ( लंका येते. )

लंका—कुठं चाललां ? कुठं चाललां माझ्या लाडक्यांनों ? अण्णा ! अरे बाळ ! जाऊं नका हं बाहेर. तो बुवाजी तुम्हांला धरून नेईल. अग बाई ! आला ग आला-मेला बागुलबुवा आला !

[ पद. ]

बागुलबुवा ग आला । घरिं त्या दडोनि बसला । बाळा ॥ ॥ धृ० ॥ नील नभामधिं दौडत मेला । चांदण्यांस धरण्याला । बाळा ॥ १ ॥ रात्र भयाकुल पसरुनि पदरा । पाहि त्यास दडवाया । बाळा ॥ २ ॥

सोर०—(हंसत) ही तुमची बायको वाटतं ? अरे अरे ! वेड लागलं ! वाईट झालं !

सारं०—सोरट ! तुम्हीं जा आतां इथून. थांबू नका मुळीं सुद्धां.

सोर०—( हसत ) येतों तर मग. ( सोरट जातो. )

लंका—( सारंगाचा दंड धरून ) अण्णा ! तो बघ-तो थेरडा बाबांच्या आईच्या औषधांत कायसं ओततो आहे. अग बाई, वीष ! तीं

पहा आईबाबा तडफडत आहेत. गेलीं ग बाई गेलीं मला टाकून! आई ग आई!—आणि माझे भाऊ, कुठं जात आहेत हे दूर—दूर—दूर चालले! कोण नेत आहे त्यांना तें? अग बाई! तोच तोच थेरडा! मेले म्हणतो तुझे भाऊ! माझे भाऊ मेले? नाहीं ग बाई. ते पहा, ते पहा माझे भाऊ कसे आहेत पहा. जसे रामलक्ष्मणच. वनवासाला गेले आहेत. येतील येतील परत.

[पद.]

गुणगुणलें कोण ग बाई। कीं येतिल माझे भाई ॥ ध्रु० ॥
जे गेले ते नच आले। पुनरपि जगीं ना दिसले। चौऱ्यायशीं धुंडित बसले। जग फसवें असलें बाई। परि येतिल माझे भाई ॥ १ ॥ जे आले ते पण जाती। मग गेले कां नच येती। चंद्र सूर्य जाती येती। हा सवाल माझा बाई। बघ येतिल माझे भाई ॥ २ ॥

सारं०—लंके! चल आंत—

लंका—माझे भाऊ येतील ना?

सारं०—हो येतील. चल—चल कशी.

[ लंका व सारंग जातात.

---

## प्रवेश दुसरा.

[ स्थळ—हमीराचा बंगला. एक दिवाणखाना. ]

हमी०—( स्वगत ) ही मनाची तळमळ शान्त तरी कशी होणार! का माझ्या देहावर प्रेतकळा येईपर्यंत अशीच ही चालू राहणार? हा प्रेमाचा उद्भवच माझ्या मनांत झाला नसता तर?—पण लकेरी! तुझ्या मुखाच्या मनोरम उद्यानांत मुसमुसलेलें गुलाब दृष्टीस पडल्यावर—तुझ्या प्रीतिलतेच्या—अंगाखांद्यावर प्रेमकलिकेची बालिका नाचूं बागडूं लागल्यावर—अमृतानं ओथंबलेला तुझा अधरोष्ठ चित्ताकर्षक जादू पसरूं लागल्यावर—कोणता शुक्राचार्य असहकारितेचा मार्ग आक्रमण करील?—लकेरी!

मला आपला गुलाम बनवून शेवटीं असं लाथाडून टाकावंस ना?–पण लकेरीला दोष देण्यांत तरी काय अर्थ ? तिचा बाप–नुसत्या पैशाच्या उवेनें मुलीला स्वर्गसुखाचा लाभ मिळेल या वेड्या वासनेनं भडकलेला तिचा बाप–त्या शतमूर्ख सोरटाशीं तिचं लग्न जमवितांना तिच्या इच्छेला थोडीच भीक घालतो आहे ! पण लकेरी तरी आपल्या नेत्रांनीं–हाव-भावांनीं प्रदर्शित करीत असलेलं प्रेम खरं कशावरून ? तें दिखाऊ–नकली–हिणकस तर नसेल ? तें जर बावनकशी असतं तर पित्याच्या कोपाग्नीला तें डगमगलं नसतं ! जातिवंत प्रेमाला प्रसंगीं अनिवार सामर्थ्य चढतं. स्वकीयांचा मायापाश तें ताडकन् तोडून टाकतं ! लोकापवादाचा डोंगर तें छिन्नविछिन्न करतं ! पण आपल्या प्रिय वस्तूची प्राप्ति करून घेतल्यावांचून रहातच नाहीं. लकेरी! हा हमीर अशा प्रेमाचा भुकेला आहे! अशा प्रेमाचा संचार जर, लकेरी ! तुझ्या रोम-रोमांत झाला–पण लकेरीकडून ज्या कृतीची मी अपेक्षा करतों ती माझ्या हातून तरी कुठं घडते आहे? लकेरीचं लग्न मोडणं माझं काम होतं. हरएक उपाय करून मीं तें मोडायला हवं होतं. पण मी हॅम्लेट-सारखा नुसता विचार–विचार करीत बसलों आहें. अरेरे! लकेरी! या कृतिशून्य हमीराला नुसता दळहळत बसलेला पाहून तुला त्याचा किळस आला असेल! छेः! लकेरी माझ्या हातची गेली ! निराश होऊन माझ्या-कडे तिनं पाठ फिरवली! ती मला कायमची अंतरली!

[ पद. राग–काफी. ताल–दीपचंदी. ]

तिमिर तिमिर घन दावरे। तुरले नभिं तारे॥ धृ०॥
ऐसे निराशे गर्जत हर्षे। मरणांत खरें सौख्य उरे। सखये ने स्वकरें॥ १॥

[ लकेरी येते व हमीराचे पाय घट्ट धरते. ]

लके०—हमीर! हमीर! हमीर!—

हमी०—कोण लकेरी! लकेरी!–लकेरी!—

लके०—होय लकेरीच! हमीर! मी सोरटाशीं साफ लग्न करीत नाहीं असं बाबांना निक्षून सांगितलं, आणि घराचं पुन्हां तोंड पहायचं नाहीं असा निर्धार करून इकडे आलें आहे. हमीर, या लकेरीला अंतर देऊं नका! ही लकेरी आपल्या पायाशीं प्रेमाची भिक्षा मागते आहे, नाहीं म्हणूं नका. आपल्या प्रेमाचं पांघरूण तिच्यावर घाला. प्रेमाच्या पहाऱ्यांत तिला ठेवा. प्रेमाचं जीवन देऊन तिचा जीव वांचवा.

[ पद. राग—पिलु. ताल—कवाली. ]

दिलरुबा हा या जिवाचा । बाज साजिरा । हमिरा हा ॥ धृ० ॥ पांखरा या । प्रेम गाया । स्कंधीं हृदयीं घ्या । खुल्या दिलाचे पडदे खोला । कालिं कालिं या । गडे या—या ॥ १ ॥

हमी०—अहाहा ! लकेरीच्या प्रेमाकरितां या हमीरानं आपले पंचप्राण अर्पण केले, तरी त्या प्रेमाचं मोल पुरं होईल का ? लकेरी! तुझ्या मुखांतून निघालेलीं हीं अक्षरं म्हणजे आसन्नमरण रोग्याच्या मुखांत पडलेले अमृतबिंदुच. या वेळीं तुझा मंजुळ आवाज माझ्या कानांत गुंगून राहिला आहे. सुरलोकच्या सप्तसुरांनीं मुलामपणाचा कमालीचा मिलाफ करून बनवलेली ही मूर्ति-लकेरी, तुझ्या रूपानं या भूलोकीं अवतरली आहे! स्वर्गीय प्रेमाच्या दिव्य तेजाची साक्षात् प्रतिमा जी विद्युल्लता ती-लकेरी! तुझ्या रूपानं इथं चमकते आहे! पृथ्वीच्या उत्पत्तीपासून तिच्या पृष्ठभागावर सद्गति न मिळाल्यामुळं खितपत पडलेले प्रेमी आत्मे, प्रेमलोकीं उद्धरून नेण्याकरितां, प्रेमी भगीरथाच्या तपश्चर्येनं प्रसन्न झालेली आकाशगंगा-लकेरी, तुझ्या रूपानं या हमीराच्या देहावर उडी घेत आहे! गंगेला शंकरानं आपल्या शिरावर धारण केलं तसं माझंहि मस्तक तुझ्या चरणस्पर्शानें पवित्र होऊं दे.

लके०—असं काय गडे ? गंगेला शंकराच्या मुखाचं चुंबन घ्यायची अनिवार वासना झाली म्हणून तिनं त्याच्या शिरावर उडी घेऊन आपली हौस पुरी केली! तशी मी—नको ग बाई! मला या पायांची सेवाच बरी वाटते.



लकेरी—असं काय गडे ! सूत काढायला मला शिकवायचं ना ? ( पान ४१. )

Photo by M. N. Kirtikar, Bombay. ] [ Blocks by Manoranjan Press, Bombay.

हमी०––पण मग हें गंगावतरणाचं चित्र असं कां? ही गंगा पहा! शंकराच्या मुखावर आतां पाय देणार असं वाटतं. युरोपियन लोकांत स्त्रिया हाताचं चुंबन देतात तसं पायाचं चुंबन देण्याची पद्धति देवलोकींच्या स्त्रियांमध्यें होती कीं काय? पुढं कधीं काळीं स्त्रिया पुरुषांची पायमल्ली करणार, याचं सूचकचित्र तर रविवर्म्यांच्या कल्पनेंतून निघालं नाहीं ना? लकेरी! या अलौकिक चित्राला तूं मान दे आणि तुझे पदरज शिरावर घेऊन मला कृतकृत्य होऊं दे.

लके०––छेः गडे! हें काय भलतंच! गंगेचं चित्र रेखाटतांना रविवर्म्यांची दिशाभूल झाली, म्हणून मी आपली कशी होऊं देईन? माझी गंगा भूलोकीं उतरतांना असे हात करून शंकरापुढं धांवत येईल आणि त्याला आलिंगन देऊन त्याच्या मुखाचं चुंबन घेईल.

हमी०—आणि मग हा शंकर या गंगेचा लोट अंगावर घेऊन तिच्या प्रेममय प्रवाहांत असा वाहत राहील!—लकेरी! लाडके लकेरी! या समोरच्या आरशांत निसर्गानं चितारलेलं हें प्रेमाचं चित्र पहा! नको नको, दूर होऊं नकोस,—हें चित्र पुसून टाकूं नकोस—छेः! तूं नाहींच ऐकलंस शेवटीं!

लके०––हमीर! हा आरसा जसा भंगुर, तसं तें चित्रही क्षणभंगुरच. त्यापेक्षां या प्रसंगाचं आपल्या हृदयाच्या आरशांत उमटलेलं छायाचित्र खरं वज्रलेप–खरं अजरामर नाहीं का? कां बोलायचं नाहीं वाटतं?

हमी०—काय बोलायचं? माझा शब्द तूं मानला नाहींस. या चित्रांतल्या गंगेप्रमाणें तूं तो लाथाडून टाकलास.

लके०—आणि म्हणून या भोळ्या शंकराला राग आला वाटतं? अग बाई! माझ्यावर रागवायचं? बोलायचं नाहीं? असंच रागवायचं? रागवा गडे! आपल्या रागाचं चक्र असंच फिरत राहूं द्या. मी हा चरका फिरवित बसतें आपली! (चरक्यावर सूत काढूं लागते. तें तुटतें.) छेः! हें असं जमत नाहीं. आमच्या बी. ए. च्या परीक्षेला कांहीं हा विषय नव्हता. पुन्हां प्रयत्न करून पाहूं! छेः! अं हं! शिकल्यावांचून कसं येणार? पण शिकवणार कोण? आपण शिकवतां का? असं काय गडे? सूत

काढायला मला शिकवायचं नाहीं ? महात्माजींनीं सांगितलं आहे ना, कीं लग्नाच्या वेळीं नवऱ्या मुलामुलींना सूत काढतां येतं कीं नाहीं याची एकमेकांनीं परीक्षा घ्यावी. आम्हांला कांहीं सूत काढतां येत नाहीं. मग काय आपलं आमचं सूत जमायचं नाहीं? पण मला शिकवाना गडे सूत काढायला ! आपण सांगाल तसं करतें ! हा कापूस कसा, असा धरूं का ? हें चक्र कसं, असं फिरवायचं का ? असं ? नाहीं सांगत ? हं, हं ! आपल्यालाच माहीत नसेल ! सूत काढतां येतच नसेल ! आपला नांवाला चरका बाळगला आहे झालं नॉन-को-ऑपरेटरची ट्रेडमार्क म्हणून ! सूत काढतां येत नाहीं ना ? हं ! हं ! असंच ! असंच !

हमी०— मला सूत काढतां येत नाहीं ? सूत कांढतां आल्यावांचून का मीं एवढं सूत काढलं आहे ? हें पहा. आहे ?—ही खादी मी स्वतः हातांनीं विणली आहे. हा खादीच्या फुलांचा हार मी स्वतः फुलं कातरून तयार केला आहे !

लके०—( हार घेऊन ) होय ? इतकी मेहनत कुणाकरितां घेतली ? खरंच कुणाकरितां ?

हमी०—मला नाहीं माहित.

लके०—आपल्याला माहित नसेल पण मला माहित आहे बरं. सांगूं ?

[ पद. राग-गारा जिल्हा. ताल त्रिवट. ]

करभार हा । वधुला वरितां । मनिं या स्मरतां । रति
रसिका ॥ ध्रु० ॥ सखि सूत्रमाला । अधिरा सुखाला ।
मिठि घे गळ्याला । कशि गतिका ॥ १ ॥

( हमीराच्या गळ्यांत हार घालते. हमीर लकेरीला आलिंगन देतो, व हार तिच्याही गळ्यांत अडकवितो. )

हमी०—लकेरी ! लकेरी ! लकेरी ! लावण्यलतिके लकेरी ! पहा, पहा या आरशांत पहा ! खादीच्या पुष्पमालेनं भूषित झालेल्या या प्रणयी जोडप्याचं तें छायाचित्र पहा—

[ पद राग–जंगला. ताल–पंजाबी. ]

कामकला रणिं या । रथ सजला विजया ॥ धृ० ॥
सुमचाप शरा घे । वेधीं हृदया । घाय मुखिं या ॥ १ ॥

( चुंबन घेतो. इतक्यांत भैरव भय्या येतो. )

भैर०—शेटसाहेब ! आपके मुलाकतके वास्ते एक बुड्ढा आदमी आये है. ( एक कार्ड देतो. हमीर तें पाहून लकेरीजवळ देतो. )

लके०—बाबा–बाबा आले !

हमी०—होय. भैरव ! उस्कू अंदर भेज देवो. ( भैरव जातो. ) लकेरी तूं त्या खोलींत जा. बिलकूल भिऊं नकोस.

लके०—मी मुळींच भीत नाहीं. आपणसुद्धां जास्त बोलायचं टाळाच. ते मला परत न्यायला आले असतील, पण प्राण गेला तरी मला आतां जायचं नाहीं.

हमी०—हा तुझा निश्चय ऐकून मला दुप्पट बळ आलं ! लाडके ! पावलं वाजूं लागलीं. तूं आंत जातेस ना ? चल लौकर. ( लकेरीस खोलींत पोंचवून दार लावून घेतो. इतक्यांत दरबारी येतो. ) या राव-साहेब ! बसा.

दर०—मी इथं बसायला आलों नाहीं. लकेरीला घेऊन जायला आलों आहें.

हमी०—पण लकेरी तुमच्याबरोबर यायला राजी नाहीं.

दर०—तूं सांगशील तर ती मुकाट्यानं माझ्याबरोबर यायला तयार होईल.

हमी०—पण मी तिला तसं सांगणं शक्य नाहीं.

दर०—शक्य नाहीं ? हमीर ! असला जाबसाल माझ्यापुढं चाला-यचा नाहीं. मी रिटायर्ड पोलिस सुपरिंटेंडंट आहे. मुकाट्यानं लकेरीला माझ्या हवालीं कर. नाहीं तर तुझ्यावर किड्नॅपिंगची केस करतों.

हमी०—किड्नॅपिंगची केस ? माझ्यावर ? काय म्हणून ?

दर०—काय म्हणून ? लकेरीला पळवून आणलीस म्हणून.

हमी०—लकेरीला मी पळवून आणली ?

दर०—हो. हो. तूं पळवून आणलीस असंच मी ह्मणणार. अरे चोरा! खादीचे कपडे घालतोस आणि दुसऱ्याच्या पोरी फुसलावण्याचे धंदे कर-तोस काय? छेः छेः छेः! तुह्मीं खादीवाल्यांनीं सगळ्या देशांत धुडगूस घातला आहे. सगळीं तरणीं मुलं बिघडवून टाकलीं. माझा मुलगा किती भोळा–किती गरीब–लाख मुलगा बरं–लाख! पण तुझ्या नादानं बहकून गेला. माझी लकेरी तर केवळ गाय! पण तूं तिला वेडी केलीस!

हमी०—मीं वेडी केली ?

दर०—हो हो, तूं! तुझ्या प्रेमानं बेफाम झाल्यावांचून का ती तुझ्या पुतळ्याला कवटाळीत होती? त्याचे प्रेमानं मुके घेत होती? त्याच्या छातीवर डोकं टेंकून पडली होती? एक ताससुद्धां झाला नसेल, प्रत्यक्ष या डोळ्यांनीं पाहिलं. प्रेमाच्या वेडापासून काय अशा गोष्टी होतात! ढोंगी! चोर! भामटा! ठग! बेरड! रामोशी!

हमी०—बस्स! रावसाहेब! ही पदव्यांची खैरांत आतां पुरे! लकेरीचं प्रेम माझ्यावर बसलं हा माझा अपराध का ?

दर०—नाहीं का? लकेरीच्या मनावर तूं भुरळ घातली नसतीस तर सोरटसाहेबांशींच काय पण मी ह्मणेन त्या महाराशीं सुद्धां ती लग्न लावायला तयार झाली असती! पण हरामखोरा! तुझ्यामुळं ती मला सज्ञानपणाचा कायदा सांगूं लागली! मला पिनलकोडाचीं कलमं दाखवूं लागली! आणि बेफामपणानं घर सोडून इकडे आली!

हमी०—पण आपण तरी इतक्या मजलेपर्यंत गोष्टी कशाला आणाव्यात? सोरटाशीं लग्न करायची जर तिची इच्छा नाहीं, तर त्याच्या-शींच लग्न लावायचा तुमचा तरी हट्ट कां ?

दर०—कां? तिचा बाप ह्मणून! चोरा! मला जबाब विचारतोस? महार–चांभार–धेड–भंगी–झाडू! थांब, तुला बुटाच्या लाथाच लगावल्या पाहिजेत.



लकेरी—हां—हें काय ?

( पान ४५. )

Photo by M. N. Kirtikar, Bombay. ]

[ Blocks by Manoranjan Press, Bombay.

हमी०—रावसाहेब ! आपलं तोंड आपल्या उपायानंच मला बंद पाडतां आलं असतं, पण ही खादी मला तसं करूं देत नाहीं. पण आपल्याला हात जोडून सांगतों, मी महात्मा नाहीं—मी सामान्य मनुष्य आहें. आपल्या संतापाची सीमा माझ्या शांतपणाच्या सरहद्दीला आपण भिडवूं नका. आग लागलेल्या घराच्या पागोळीला भिडलेलं घर पेट घेतल्यावांचून रहात नाहीं, हें आपल्याला माहीत असेलच.

दूर०—मला सगळं माहित आहे. मी रिटायर्ड पोलिस सुपरिंटेंडंट आहें. तुझ्या अंगाला आग लागली तर काय करशील रे ! ट्रेसपासची केस करशील ?

हमी०—मी ही खादी वापरतों आहें. तेव्हां केस करण्याचा प्रश्नच नाहीं. पण शिव्या द्यायच्या असल्या तर इथून एकदम चालते व्हा.

दूर०—होत नाहीं. लकेरीला घेतल्यावांचून मी इथून जात नाहीं.

हमी०—इथं कपाळ फोडून घेतलंत तरी लकेरी तुमच्या हातीं लागत नाहीं. घ्या कपाळ फोडून हवं तर.

दूर०—मी कपाळ फोडून घेऊं ? थांब, या रिव्हाल्व्हरनें तुझाच कपाळमोक्ष करतों. ( खिशांतून रिव्हाल्व्हर काढून हमीरावर रोखतो, तोंच दरवाजा उघडून एकदम लकेरी येते. )

लके०—हां–हें काय ?

दूर०—कोण लकेरी ? मला वाटलं आकाश फोडून वीज बाहेर आली ! किंवा माझ्या रिव्हाल्व्हरचा हात कलम करण्याकरितां हमीरानं म्यानांतून तरवार काढली ! लकेरी ! चल घरीं परत.

लके०—घरीं परत ! बाबा तें विसरा. माझा प्राण गेला तरी मी परत यायची नाहीं.

दूर०—तुझ्या या शरीरांतला प्राण, मी माझा प्राण गेला तरी घ्यायचा नाहीं.कारण तो तर माझं भांडवल ! पण तूं जर माझ्याबरोबर येत नसशील तर तुझा हा प्राण–तुझ्या या प्राणाचा प्राण–या हमीराचा प्राण घेतल्यावांचून मी रहाणार नाहीं. हमीर ! मी किती निर्दय आहें हें तुला

माहीत नाहीं. आजपर्यंत मी कितीतरी खून केले आहेत, आणि ते जिरवलेही आहेत. म्हणून म्हणतों तुला आपला जीव वांचवायचा असेल तर लकेरीला माझ्याबरोबर यायला सांग.

हमी०—रावसाहेब ! आपण नुसती खुनाची धमकीच काय पण माझा खून करण्याकरितां गोळी झाडलीत तरी 'लकेरी, तूं इथून जा,' अशीं नामर्दपणाचीं अक्षरं या मुखांतून मुळींच निघणार नाहींत.

[ पद. राग—सोहनी. ताल—तिताल. ]

या प्रणयमाध्यान्हीं। प्रसेला तम पिडितां । अरिभयें तो सविता । निज प्रकृतिगुणां । नच त्यागी ॥ धृ० ॥ मरणिं भय न मज। मरण भयाला । परी दोषभय प्रणययशाला ॥१॥

दूर०—तुला जीव नकोसाच झालेला दिसतो. लकेरी ! कुठं चाललीस ? माणसं बोलवायले ? इथून एक पाऊलभर हाललीस किंवा कुणाला हांक मारण्याकरितां तुझे ओंठ नुसते हलले तर या रिव्हाल्व्हरची गोळी हमीराच्या हृदयांत शिरलीच म्हणून समज.

लके०—अग आई ग !

दूर०—हमीरावर गोळी झाडतांना झालेला आवाज ऐकून चाकर माणसं धांवत येतील ! मला कैद करण्याकरितां दहा पांच पोलिसांचीहि पार्टी येईल. पण पहा—नीट पहा, हें सहाबारी पिस्तुल पुरं भरलेलं आहे. या पट्टयांत पन्नास काडतुसं आहेत. मी म्हातारा असलों तरी माझा नेम अचुक आहे. या दिवाणखान्यांत जो कोणी पाऊल ठेवील, त्याचा मुडदा पाडीन ! मी तर जीवावर उदार झालों आहें. या पिस्तुलाच्या पिचकारीनं आज रंगपंचमीचा रंग खेळेन, हा हमीराचा रंगमहाल रक्ताच्या रंगानं माखून टाकीन, आणि शेवटची गोळी या माझ्या मस्तकांत मारून घेऊन स्वतःचा कपाळमोक्ष करून घेईन. लकेरी ! या रक्तपाताला कारण तूं होणार आहेस. या आपत्तीचं पाप आपल्या शिरावर घेऊं नकोस. मुकाट्यानं माझ्याबरोबर घरीं चल.

लके०—( हमीराच्या गळ्याला मिठी मारून ) अरे देवा ! मी आतां करूं तरी काय? हमीर! हमीर! बाबा बोलल्याप्रमाणं करतील हो! तुमच्या प्राणांवर प्रसंग—अग बाई!—मग मी कुणाच्या तोंडाकडे पाहूं? बाबा—माझेच प्राण घ्या ! मलाच या जगांतून नाहींशी करा.

दर०—तुला नाहींशी करूं? छेः छेः! तुला तर मी बरोबर घेऊन जाणार ! मुकाट्यानं येत नसशील, तर जबरदस्तीनं नेईन.

हमी०—रावसाहेब ! या हमीराच्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत लकेरीला या घरांतून जबरदस्तीनं घेऊन जाईन असा विचारसुद्धां मनांत आणूं नका. लकेरी! भिऊं नकोस–माझ्या जिवाची मुळींच काळजी करूं नकोस.

लके०—बाबा ! तुम्हीं जर माझं सोरटाशीं लग्न करणार नाहीं असं वचन देत असाल, तर मी तुमच्याबरोबर येतें.

दर०—छेः छेः! असलं वचन मीं कधींच देणार नाहीं. सोरटाशीं लग्न करण्याकरितां तर तुझी जरूरी ! नाहीं तर तुला नेण्याचा उपयोग काय? खोटं बोलतां बोलतां माझा जन्म गेला. पण या वेळीं मी खोटं बोलत नाहीं, आणि भलतंच वचनही देत नाहीं.

लके०—मग मीही तुमच्याबरोबर येत नाहीं.

दर०—येत नाहींस ? मग बघ, हा तुझा प्यारा हमीर या पिस्तु-लाच्या गोळीला कसा बळी पडत आहे तो.

हमी०—चांडाळा ! बस्स कर तुझ्या पिस्तुलाच्या आणि खुनांच्या गप्पा ! दहा पांच गुंडांना आणि दरवडेखोरांना पकडून तूं बहाद्दरी मिळ-वली असशील, भासकं भुसकं दंग्यांत तरवार गाजवली असशील, पण वॉरवर असतांना मीही माशा मारीत बसलों नव्हतों समजलास ? तूं जरी सॅन्डोचा बाप असलास तरी तुझ्या हातांतलं पिस्तुल असं– ( दरबारीवर धांवतो. )

लके०—( हमीराला आवरून धरून ) हें काय ? असा प्राण काय म्हणून धोक्यांत घालायचा गडे ? त्यांच्याशीं हातघाईला याल तर

गळ्याची शपथ आहे माझ्या. बघा मोडाल तर! पाप लागेल! माझं कांहीं होऊं द्या, पण आपल्यावर संकट नका ओढवून घेऊं. शपथ, शपथ आहे माझी!

हमी०—लकेरी, मला शपथ घालून तूं काय मिळवलंस? आतां एवढं तरी कर; मला सोडून तरी तूं जाऊं नकोस.

लके०—आपल्या मनाला दुःख देऊन मी कशी जाईन?

दर०—हं लकेरी! सांग, चलतेस कीं नाहीं? मला आतां वेळ नाहीं इथं रहायला.

लके०—हमीर! काय हो करूं? जाऊं? सांगा जा ह्मणून!

दर०—अरे बाबा! सांग–जा ह्मण–नाहीं तर मर.

हमी०—मर मर, तर मार! लकेरी, तुझ्या गाढ आलिंगनांत मृत्यु आला तर दिव्य प्रेमाचा दुंदुभी देवलोकीं माझ्या नांवानं दुमदुमत राहील. पण मरणाला भिऊन 'तूं या कंगालाबरोबर जा' असं जर मीं सांगितलं तर सगळ्या जगांत माझी छीः थूः होईल!

दर०—लकेरी! तुला एकच सांगतों! यायचं असेल तर चालायला लाग; नाहीं तर—

लके०—थांबा हो थांबा! बाबा! असे निष्ठुर होऊं नका. हमीर! विषाची परीक्षा कशाला पहायची! मी जातें. जाऊं द्या मला. हो ह्मणा! नाहीं! बाबा तुह्मीं तरी! देवा! कुणीच ऐकत नाहीं. हमीर! हा बाप नव्हे हा चांडाळ मांग आहे हो! त्याला दया माया नाहीं हो! तो खरोखरच आपला प्राण घेईल! या वेळीं हमीर! आपल्या प्राणांकरितां जर मी कितीही असह्य–अपमान–जगाची छीः थूः सोसायला तयार झालें नाहीं, तर आपल्यावर माझं प्रेम तें काय? हे पाय सोडून जाण्याबद्दल सगळं जग मला दोष देवो; आपल्या शब्दाला मान दिला नाहीं, ह्मणून प्रत्यक्ष आपल्या मतानं मी अपराधी ठरो; आपली अवज्ञा केल्याचं पाप माझ्या माथीं पडून, माझं भावी आयुष्य दुःखांत हालअपेष्टांत जावो; मला एकच समजतं–या बिनमोल प्राणांकरितां–या लाडक्या जीवाकरितां–

या माझ्या प्राणाच्या परमेश्वराकरितां–मी हें करतें आहें. चला बाबा! मी आपल्या बरोबर येतें–हमीर! सोडा मला.

हमी०—लकेरी! लकेरी! तूं हें काय करते आहेस?

लके०—कांहीं नाहीं. पतीच्या प्राणांकरितां खऱ्या पतिव्रतेनं जें केलं पाहिजे तेंच करतें आहे.

[ पद. राग—भीमपलास. ताल—आधा. ]

प्रियजनघात । निवारणार्थ । सति सुभगा । करि
आत्मयाग ॥ ध्रु० ॥ तृणसम हा जिव । प्रीति चिरायु ।
कांचनसम वांछित दिव्य योग ॥ १ ॥

मी येतें. माझ्यावर लोभ ठेवा.

दर०—हमीर! हः हः हः ( दरबारी जातो. )

हमी०—गेली–लकेरी गेली! मला जन्माची अंतरली! या हमीराच्या जन्माची माती माती झाली! ( हमीर धाडकन् बेशुद्ध पडतो. )

( पडदा. )

अंक तिसरा समाप्त.

# अंक चौथा.

## प्रवेश पहिला.

[ स्थळ—रस्ता. अण्णा व बाळ येतात. ]

अण्णा—अरे, हेंच हेंच तें ठिकाण ! ती बघ कंपनीच्या नांवाची पाटी ! हेंच बिऱ्हाड मंडळीचं ! पत्ता तर अगदीं बरोबर सांपडला ! पण बाळ, थांब, आंत जायच्यापूर्वीं पुन्हां एकदां विचार करावा तें बरं. आपण नाटककंपनींत रहायला जातों आहोंत ह्मणून ह्मणतों.

बाळ—अण्णा ! आतां तुझा विचार–विचार पुरे. जवळ सगळे चार आणे राहिले आहेत. याचे एकदां पोटांत कांटे भरले, कीं संध्याकाळला ठणठणपाळ ! नाटकमंडळींत ती तरी काळजी नको. राजासारखं रहायला सांपडेल ! खायला प्यायला यथास्थित ! झोंपायला अंथरुण पांघरुण व्यवस्थित. अंगावर घालायला कपडे नीट. शिवाय तो गृहस्थ ह्मणाला, तुमचे आवाज आहेत बरे, तुह्मांला मालक पगारसुद्धां देईल थोडा बहुत ! यापेक्षां आणखी तें काय पाहिजे रे ?

[ पद. राग–काफीझिंजोटी. ताल–त्रिवट. ]

मज गमत खचित कामधेनु माता। ही सफल करिल रे सकल मनीषा। कल्पतरु नतां ॥ ध्रु० ॥ मिळवुं नांव या। सौख्य धन दया। सिद्धिकाल शुभ हाचि या। चल नको लाजुं पद उचल आतां ॥ १ ॥

अण्णा—खरंच, आजच्यापेक्षां आपण किती तरी सुखी होऊं. ईश्वराच्या कृपेनं आपल्याला या कलेचं शिक्षण मिळून जर रंगभूमीवर आपल्याला यश आलं, तर आपला नांवलौकिकहि होईल थोडा बहुत. बाळ, निदान एका गोष्टीकरितां तरी मला नाटकांत जावंसं वाटतं. ही कंपनी नांवाजलेली आहे, आणि यांचे खेळ पहायला चांगली चांगली

मंडळी येत असते. नशिबानं जर एखादे वेळीं आपली अक्का नाटकाला आली आणि आपण तिच्या नजरेस पडलों तर न जाणों आपलं सगळं कांहीं भरून येईल.

बाळ—अरे, मग तर काय काय होईल तें विचारूं नकोस ! अक्कानं आपल्याला ओळखलं मात्र पाहिजे ! नाहीं तर आपण ओळखूं. मी खात्रीनं अक्काला ओळखीन. मला चांगली आठवण आहे तिची. तूं तर सहज ओळखशील नाहीं ?

अण्णा—मी ? वाटेल तशी. अक्काची तर गांठ पडूं दे; तिला विचारतों, श्रीमंत झालीस म्हणून भावांना विसरलीस वाटतं ?

बाळ—अरे, मग कशाला विचारायचं तसं ?

अण्णा—अरे, मगच विचारायचं. तिनं आपला तपास करायला नको होता का ?—पण श्रीमंत पडली; कसा करील ! या मुंबईत पहा, एक तरी श्रीमंत आपल्याशीं नीट वागतोय् का ? सारखं हिडीस फिडीस करतात. अरे बाबा, ही श्रीमंती नव्हे, ही मोहक रूप धारण करणारी मायावी राक्षसी मस्ती आहे.

[ पद . कवाली. ]

धनिक ना भीत भगवंता। विधाता देइ त्या सत्ता ॥
धनाची धुंदि त्या येतां। मानिना माय ना कांता ॥
दयेच्या सांगती बाता। अनाथां मारिती लाथा ॥
संपदा माळ घालीतां। राहिना ताळ श्रीमंतां ॥ १ ॥

बाळ— बरं. मग आतां नाटक कंपनींत जायचं ठरलं ना ? मग एकदां कर मनाचा हिय्या आणि चल. मी होऊं पुढं ? का तूं होतोस ? प्रथम त्या कालच्या गृहस्थाला गांठूं ये ? नांव काय पहा त्याचं ?—विसरलों !

अण्णा—श्रीमंत झालास वाटतं इतक्यांतच ? अरे बाबा, हे श्रीमंतीचे डोहाळे पडताहेत बरं तुला ! संभाळ—

बाळ—पण नांव काय त्या गृहस्थाचं बुवा ?

अण्णा—अरे त्या भल्या गृहस्थानं, आपली नीट विचारपूस केली, नाटकाला फुकट बसवलं–वर कपकप चहा दिला आणि "बाळांनों, उद्यां सकाळींच या हं;" ह्मणून मोठ्या काळजीनं ह्मटलं त्याचं नांव सुद्धां तूं विसरलास? बरं चल आंत, मला ठाऊक आहे तें. (जाऊं लागतात तोंच सोरट येतो व दुसऱ्या बाजूस जात असतां त्याच्या खिशांतून नोटाचें पाकिट पडतें.) अहो–साहेब! तें पाकिट पडलं पाकिट! (बाळ पाकीट उचलून आणतो. तें पाहून) अरे बापरे! पांच पांचशेंच्या नोटा! अहो साहेब–अहो साहेब! (दोघेही ओरडतात. सोरट परत येतो.) हें आपलं पाकिट सांपडलंयू नोटांचं!

सोर०—(रडत) सांपडलं! बरं झालं! चांगलं झालं!

बाळ—बरं आमचं लक्ष्य गेलं! आपल्याला साहेब साहेब ह्मणून ओरडलों सारखे, पण आपण मारे चालला होतां पुढं!

अण्णा—आहेत ना सगळे पैसे? जायची भीतिच नाहीं ह्मणा. आह्मीं होतों ना इथं.

सोर०—(रडत) आहेत–सगळे आहेत. दहा हजारच्या दहा हजार आहेत! गेले असते तर केवढं नुकसान झालं असतं!

बाळ—पण आतां मिळाले ना? मग उगीच कां रडतां?

सोर०—(रडत) मी रडत नाहीं–हंसतोयू! मला किती तरी आनंद झाला आहे!

बाळ—अण्णा! हा आनंदाचा चेहरा बरं, लक्ष्यांत ठेव.

सोर०—(रडत) तुह्मी फार इमानी आहां रे मुलांनों. तुह्मांला काय बक्षीस देऊं असं मला झालं आहे! तुह्मी काय करीत असतां रे?

अण्णा—कांहीं नाहीं, असेच हिंडतों आहोंत झालों. आम्हांला आई-बाप वगैरे कुणीच नाहींत. होते ते वारले.

सोर०—(हंसत) वारले! हः हः हः हः! तुमचे आईबाप वारले?

अण्णा—हो, दोन वर्षे झालीं! इन्फ्लुएंझा झाला त्यांना.

सोर०—(हंसत) इन्फ्लुएन्झा झाला? अरे अरे अरे अरे! वाईट झालं!



वाळ—अण्णा, हा आनंदाचा चेहरा वरं, लक्ष्यांत ठेव. ( पान ५२.)

Photo by M. N Kirtikar, Bombay. ] [ Books by Manoranjan Press, Bombay.

बाळ०—आणि तेव्हांपासून उपाशीं मरतों आहोंत.

सोर०—(हंसत) उपाशीं मरतां आहांत? अरेरेरे! पण कां रे, उपाशीं कां मरतां?

बाळ०—खायला अन्न नाहीं म्हणून. जेवायचं कुठं आणि काय?

सोर०—अरे, हॉटेलांत जायचं! या मुंबईस तोटा का आहे हॉटेलांचा? ताजमहाल आहे, वॉटसन आहे, सरदारगृह आहे, माधवाश्रम आहे—

अण्णा०—पण ते फुकट थोडंच जेवायला घालणार आहेत? पैसे कुठून आणायचे त्यांना द्यायला?

सोर०—कुठून? बँकेंतून! चेक लिहायचा आणि काढायचे पैसे! अरे, त्यांत काय रे एवढं मोठं होतं?

बाळ०—साहेब! चेक आणि बँक काय असतं? आम्हीं ऐकलींसुद्धां नाहींत हीं नांवं! तें आपल्या श्रीमंतांचं कांहीं असेल! आम्ही ब्राह्मणाचीं पोरं आहोंत. पूर्वीं श्रीमंत होतों, पण आतां अगदीं भिकारी झालों. आतां पोटाला नाहीं बघा! म्हणून या नाटककंपनींत रहायला जातों आहोंत.

सोर०—छेः! तुम्हांला नाटककंपनींत कोण जाऊं देतो? माझ्याकडे चला. आज तुम्हीं माझे एवढे पैसे वांचवलेत. जन्मभर मी तुम्हांला सोडायचा नाहीं. मी खूप श्रीमंत आहें. माझी पंचवीस लाखांची जिनगी आहे. माझ्या बापांनीं थोडीच मिळविली होती! चला खा–प्या–चैन करा! तुम्हांला प्रथम कपडे केले पाहिजेत. चला, ती बघा माझी मोटार. कोटांत जाऊन सूट्सच्या सूट्स घेतों तुम्हाला. तुम्हीं फार चांगलीं मुलं आहां. मला अतिशय आवडतां. माझं परवां लग्न आहे. हें पहा इन्व्हिटेशन कार्ड! आहे! मला भाऊबीऊ कुणी नाहीं. तुम्हींच माझे भाऊ! मला आज दोनप्रहरीं नाटकाला जायचं आहे. तिकिट काढायलाच गेलों होतों. आतां– तुम्हीही चला–तुमच्यासाठीं दोन सीटस् आणखी घेतों. इथं उभे रहा हं. मी आत्तां येतों परत. (जातो.)

बाळ—अण्णा, विचार कसला करतोस? हें कुळ बरं आहे. मनुष्य जरा वेडसर आहे—

अण्णा--असेना वेडसर, पण भला मनुष्य दिसतो. आपण जाऊं या याच्याबरोबर. ( सोरट येतो. )

सोर०—हं चला रे-पण काय रे तुमचीं नांवं काय ?

बाळ—माझं बाळ आणि याचं अण्णा !

सोर०--( रडत ) बरं बरं. चला, लौकर चला. अरे, इतके थांबू नका. कांहीं विलायतेस नाहीं जायचं. मी जाणार होतों कालच पण रावसाहेब ह्मणाले नको, मग जा.-माझं लग्न झालं ह्मणजे तुह्मांलाही नेईन बरोबर विलायतेस. [ जातात.

## प्रवेश दुसरा.

[ स्थळ--दरबारीची निजण्याची खोली. दरबारी व हिंदोल येतात. ]

दर०--हें पहा, हिंदोल, भटजीमहाराज आल्याबरोबर मला हांक मारा ! पहांटेस तीन वाजतां ते कोंबड्यासारखे एकदम आरवतील. त्यांची घटकापात्राची वगैरे तयारी करून द्या. तसेंच वाजंत्री आले, कीं, त्यांना एक बाजा करायला सांगा, नाहीं तर ते मुकाट्यानं बसतील आणि घरांत सगळाच बोंबबाजा होईल. बँड बरोबर सातांला पांच मिनिटं असतांना येईल. ते साहेबलोक आहेत. अगदीं रेग्युलर ! एक मिनिट फरक नाहीं व्हायचा टाईममध्यें ! लग्नमुहूर्त नऊ सत्तावीसला आहे. नवरानवरीवर अक्षता पडतांच नायकिणीचा नाच सुरू करा. अरे असा, झोपाळ्यासारखा झोंके काय घेतो आहेस हिंदोल ? का नायकिणीचं नांव निघतांच तूंच आपला नाच सुरू केलास ? पेंगतो आहेस वाटतं झोपेनं ? ऐक, पहांटेपासून लंकेला कोंडून ठेवा. समजलास का ? नीट कोंडून ठेवा. नाहीं तर सगळीकडे घोटाळा करील ती वेडी. सारंग बोलला तर त्याला सांगा--

हिंदो०--अजून ते आले नाहींत परत.

दर०--काय सारंग अजून परत आला नाहीं ? बारा वाजले तरी कसलीं आमंत्रणं करतो आहे ? बरं, आज लग्नाचं आमंत्रण, पगडीविगडी

घालून जायचं होतं ! पण छेः ! मुतक्यासारखी घातलीन् खादीची सदरा-टोपी आणि निघाला आमंत्रणाला ! जसा कांहीं माझ्या मर्तिकाचं आमंत्रण करतो आहे! वरं जा—मला वेळेवर उठवा. ( हिंदोल जातो. ) सगळी तयारी तर जय्यत झाली ! आतां उद्यां कन्यादान होऊन एकदां लग्नाचा बार उडाला कीं आटोपलं! बाकी आतां कांहीं काळजी नाहीं ह्मणा. खरी काळजीची वेळ गेली ! हत्ती गेला, शेंपूट राहिलं आहे त्याला कोण डरतं ?—लकेरीचं रडगाणं शेवटीं आज बंद झालं. हमीराकडून परत आल्यावर तिनं कांहीं थोडं अकांडतांडव केलं नाहीं. आज तर अखेरचा आक्रोश केला ! पण हा पाषाणाचा हिमालय जेव्हां दाद देत नाहीं असं दिसलं तेव्हां बसली गप्प ! मला जन्मांत कधीं अपयश ठाऊक नाहीं. खऱ्याचं खोटं, खोट्याचं खरं अशा अनंत उलाढाली केल्या; लूट, मारामारी, जुलूम, जबरदस्ती केली. लोकांच्या घराला आगी लावल्या. पण माझं एवढं वाकडं झालं नाहीं. इस्टेटीच्या इस्टेटी घशांत उतरल्या पण कांहीं झालं नाहीं. दौलत घ्या घ्या ह्मणून पाठीला लागली, मग नको कां ह्मणायचं ? सगळ्यांत मोठं वाढं आमच्या सारंगाच्या सासऱ्याकडून चालत आलं ! चालत आलं कसलं ? स्वतःच्या करामतीवर मीं तें कमावलं! कल्याणरावांना इन्फ्लुएन्झा झाला आहे अशी मद्रासहून तार आली मात्र,—बरा सारंगही इकडे त्याच सांथीनं आजारी होता!—तडक मद्रास गांठली आणि कल्याणरावांच्या आणि त्यांच्या कुटुंबाच्या औषधांत एक एक थेंब टाकून कल्याणरावाचं सहकुटुंब कल्याण केलं ! आणि लंकेकडे इस्टेटीचा वारसा यावा म्हणून त्या दोन कार्ट्यांचीं नांवं बदलून त्यांना कलकत्त्याच्या हॉस्पिटलमध्यें टाकून तींही मेल्याचं सर्टिफिकिटं घेतलं! झालं ! प्रॉपर्टी आमच्या पोटांत जिरली ! बाकी त्या कार्ट्यांना सुद्धां कुत्र्याची पुडी घालायला हवी होती! कशी मला भूल पडली–बुद्धि झाली नाहीं–देवाला ठाऊक ! चुकलंच तें ! पण त्याची आतां कांहीं भीति नाहीं. तीं पोरं मेलींही असतील कदाचित् ! आतां तीं पिशाचं होऊन थोडींच येणार आहेत आणि मला प्रॉसिक्यूट

करून फांशावर चढवणार आहेत ! उद्यां या पोरटाशीं एकदां संबंध झाला, कीं हा माझ्या मनाचा ब्रह्मसमंध ब्रह्मानंदांत बुडून जाईल ! खरंच, लक्ष्मीनं माझ्या मनांत विहार करावा हें बरोबरच आहे !

[ पद. राग-दरबारी कानडा ताल-त्रिवट. ]

खलमनिं या कमला विराजे । श्यामरता बाला ॥ ध्रु० ॥
घननभांत विलासा भोगी । विशालबला चपला ॥ १ ॥

हमीराच्या माथ्यानं गिळलेलं लकेरीचं माणिक जर आज त्याच्या घशांतून ओकवतों ना, तर मात्र—पण ओकवल्यावांचून कसा राहीन ! —हें एवढं ( पिस्तुल दाखवून ) जाज्वल्य औषध जवळ असल्यावर—ही त्रैलोक्यचिंतामणीची मात्रा दिल्यावर—या मुलुखमैदानचं दर्शन झाल्यावर कसलीही असाध्य गोष्ट साध्य झाल्यावांचून राहते का ? हें पिस्तुल माझ्या हातांत पडल्यापासून मला सारखं यशच येत गेलं आहे. वाघ-डुकरांच्या शिकारींत यानं माझी सेवा केली आहे ! प्राणांवर उठलेल्या दरोडे-खोरांपासून यानं माझं रक्षण केलं आहे ! कित्येक वैऱ्यांचे जीव वैरून यानं मला वैभवाला चढवलं आहे. अनेक जिवावरच्या प्रसंगांतून यानंच मला वांचवलं आहे ! बा पिस्तुला ! तूं माझा प्राण आहेस ! प्राणच काय, तूं माझा परमेश्वर आहेस ! तुझी नित्य पूजाच केली पाहिजे. या काडतुसांचीं फुलं मी तुला वाहतों—या काडतुसांची माळ मी तुझ्या गळ्यांत घालतों. या काडतुसांच्या पेट्यांत भरलेल्या दारूचा नैवेद्य मी तुला अर्पण करतों ! या नैवेद्याचा प्रसाद तूं मला दे ! माझ्यावर एवढा अनुग्रह कर कसा—पण नको, श्राद्धाच्या वेळीं मांसाचं काम जसं उडदावर भागवतात, तसं तुझ्या दारूच्या प्रसादाचं काम या बाटलींतली दारू ग्रहण करून मी पूर्ण करतों. ही दारू घेतल्यावर या दारूची मुळींच भीति नाहीं. ( बाटलींतून एक ग्लास ओतून ) हा एकच प्याला बरं ! झालं—आतां झोपावं. झोंप माझ्यावर जादू चालवूं लागली आहे. झों—प—तों—( पलंगावर झोपतो. कांहीं वेळानें लंका येते. )



लंका—हाच ग बाई हाच! आतां कुठं जाशील? ( पान ५७. )

Photo by M. N. Kirtikar, Bombay.] [Blocks by Manoranjan Press, Bombay,

लंका—बाबा! आलांत? हो शेवटीं आलांत—आलांत! आई! तूंही आलीस? ये—ये—ये—मला घे—मला कडेवर घे ग? नाहीं! बाबा—आई कडेवर घेत नाहीं मला. दोघंही मला उचलून घ्या—घ्या—घ्याच गडे! पण तुह्मीं सांपडत कां नाहीं मला? भुतं ग बाई भुतं! तुह्मीं भुतं झालांत? कां? तुह्मांला ठार मारलं? कुणी?—त्या थेरड्यांनीं? कुठं आहे मेला? दडून बसला आहे? कुठं अंधारांत? मी काढतें हुडकून!—सोडतें कीं काय? (पिस्तुलाकडे पाहून) हें काय-कंदील-चोरकंदील ग बाई, चोरकंदील! आतां चोर सांपडेल! बरा मिळाला ग बाई! याचा उजेड कसा पण आहे! आतां तो थेरडा सांपडत नाहीं का? हा-हा! (शोधते—दरबारीकडे पाहून) हाच ग बाई हाच मेला सांपडला! आतां कुठं जाशील? (गाते.)

गिरिधर गोपाल ये रे।
आसरा अनाथा तूं रे॥

(गाणें ह्मणत असतां इकडून तिकडे भयानक नाच करते व एकदम दरबारीवर पिस्तुल उडतें. आवाज झाल्याबरोबर तें तिच्या हातांतून गळून पडतें. दरबारी किंकाळी फोडून मरतो. इतक्यांत सारंग, लकेरी व इतर माणसें धांवत येतात. सर्व भयचकित होतात. लंका हिडीस हंसते.)

---

## प्रवेश तिसरा.

[ स्थळ—दरबारीच्या बंगल्यासमोरील बाग.
सोरट, अण्णा व बाळ येतात. ]

सोर०—हं, थांबा इथंच बाहेर, आंत येऊं नका तुह्मी. नाहीं तर मी आंत गेलों कीं याल पाठोपाठ. मी आलों आहें इथं समाचाराला. रावसाहेब दरबारींचं काल तेरावं झालं. तेव्हां पुन्हा लग्नतिथि ठरवायला मी आलों आहें.

बाळ—पण साहेब! आम्ही आलों तर—

सोर०—कशाला ? आह्मी आलों तर ! मी तुह्मांला बरोबर आणणारच नव्हतों. पण तुम्ही माझ्या राशीला आलांत ते काय मला सोडतां आल्यावांचून ! पोरं पण पोरं, अगदीं पांढऱ्या पायाचीं पोरं आहांत ! लग्नतिथीच्या आधीं दोन दिवस बाळ भेटलीं—लग्नाच्या आदल्या दिवशींच दरबारींनीं यमाजी भास्करांचा दरबार गांठला ! राहिलं लग्न ! झाला घोंटाळा !

अण्णा—पण आपण लौकरच याल ना साहेब? संध्याकाळ झाली. ( रिस्टवॉच पाहून ) सहा वाजले पहा. ह्मणून--

सोर०—एक पंधरा मिनिटांत मी परत येतों. तुम्हीं बसा इथं बागेची मजा पहात. ( सोरट जातो. )

अण्णा—बाळ, आपण खरोखरच पांढऱ्या पायाचे आहोंत. पण हा गृहस्थ मात्र वेडा असला तरी थोर मनाचा आहे. एखादा असता तर तेव्हांच आपल्याला हांकून लावलं असतं.

बाळ—पण आपण नकों नको ह्मणत असतांनासुद्धां साहेब आपल्याकरितां वाटेल तसा खर्च करताहेत. हेंच पहा, हे सूटस्, बज्याळं—सेंटस्—विचारूं नकोस.

अण्णा—आपला भाग्यकाल तर समीप आला नाहीं ?

( पद. केरवा. )

येई सुखाचा बुलबुल गात । उधळि ताना या ॥ धृ० ॥
आशा ललकारि हर्षा गर्जे हृदयडंका हा । नाचती नयनीं ध्वजा । प्रेमें नमित ऐश्वर्या । हें मन रंगोनी उधळि ताना या ॥ १ ॥

बाळ—तेवढा आपल्या अक्काचा पत्ता लागता—अरे, पण ही कोण ? (लंका येते.) अरे, अक्काच ! इथं जरा आड उभे राहूं आणि मग एकदम तिला फसवूं. ( अण्णा व बाळ आड उभे रहातात. )



सोरट—अरे कार्ट्यांनों ! त्या वेडीला कां त्रास देतां ?

Photo by M. N. Kirtikar, Bombay. ] [ Blocks by Manoranjan Press, Bombay.

(पान ५९.)

लंका—आज ही बाग फुलली ग बाई फुलली ! आतांच चंद्रसूर्य उगवले ! या गुलाबाला दोन फुलं आलीं ! माझा बाळ आणि अण्णा—होय ना ? होय ना ?

बाळ—अण्णा ! अरे आपली अक्का वेड्यासारखं काय करते ?

अण्णा—तिला वेडच लागलंय् वाटतं ! अक्का ! अक्का !

(लंकेजवळ दोघेही येतात व तिला कवटाळतात.)

लंका—कोण अण्णा ? बाळ ? तुम्ही ? माझे रामलक्ष्मण मला भेटले ग बाई ! ( त्यांना घट्ट आंवळते व शुद्धीवर येते. बराच वेळ मुलें 'अक्का' ह्मणून व लंका 'बाळ', 'अण्णा', ह्मणून पुन्हां पुन्हां एकमेकांना कवटाळतात. इतक्यांत सोरट व सारंग येतात. )

सोर०—अरे कार्ट्यांनों ! त्या वेडीला कां त्रास देतां ?

लंका—( सारंगाला पाहून ) अग बाई ! स्वारी !—( लाजते. )

सारं०—अं ! हें काय ?

अण्णा—अहो साहेब ! ही आमची अक्का !

बाळ०—आमची अक्का आह्मांला सांपडली ! हीच हो हीच.

सोर०—( रडत ) सांपडली ! चांगलं झालं !

सारं०—हें काय गौडबंगाल आहे ? लंके ! अं ! ही इतकी लाजायलाची लागली ? लंके ! अरे ! हिचं वेड गेलं कीं काय ? हीं मुलं कोण, लंके ?

लंका—हें काय बाई विचारायचं ! हे माझे भाऊ नव्हेत का ? हा अण्णा–आणि हा बाळ !

सारं०—पण हे जिवंत !

अण्णा—पण आह्मी मेलों होतों कधीं ?

सारं०—तुम्ही वारलांत हें ऐकून तर हिला वेड लागलं ! ताई ! अग लकेरी ताई ! अग लौकर ये—अग हें बघ काय ! ( लकेरी हातांत दरबारीचा एक एनलार्ज्ड फोटो घेऊन येते.)

लके०—काय, काय दादा ?

सारं०—अग, हिचं वेड गेलं! ती पहा लाजते कशी! लंके, बघ, बघ! हे हिचे भाऊ भेटले आणि वेड गेलं!

लके०—( फोटोकडे बोट दाखवून ) पण, बाबा म्हणाले, कीं मुलंही वारलीं!

अण्णा—( फोटो पाहून ) अरे बाळ, हाच रे हाच तो बुवा आपल्याला कलकत्त्यास नेलंन् तो.

बाळ—हाच—हाच तो थेरडा! यानं सांगितलं म्हणतां आम्ही मेलों म्हणून?

सारं०—ताई! ( दोघे एकमेकांकडे पहातात. ) पण, चला देवानं आनंदाचा दिवस दाखवला! तुमची भेट झाली आणि हिचं वेड गेलं.

बाळ—पण कशावरून गेलं? अक्का, कोण ग हे? सांग सांग कोण ते!

अण्णा—खरंच अक्का! हे कोण तें मला माहीत नाहीं. सांग ना कोण ते? ( दोघेही 'सांगना,' 'सांगना' म्हणतात. )

लंका—हे कोण तें मी काय सांगायचं? सांगूं–सांगूं?–हे किनई ते! ते बरं!

[ पद. राग–पिलु. ताल–त्रिवट. ]

शुभ सावधान समयाला। तुज चिडवीलें खुडुनि कुणी गाला ॥ धृ० ॥ मंदिल कानपिळित शिरिं येतां। हंसहंसुनि देसि चुंबनाला ॥ १ ॥

सोर०—( रडत ) सारंग! सगळ्यांना आनंद झाला आहे. तेव्हां मी म्हणतों लकेरीच्या माझ्या लग्नाचं तेवढं—

सारं०—पण ती गोष्टच काढूं नका म्हणून मी सांगितलं ना? तुमच्याशीं लग्न करायला ताई तयार नाहीं, ही गोष्ट बाबांना लिहून सांगितल्याकारणानंच बाबांनीं आत्महत्या केली! तेव्हां हा प्रश्नच राहिला नाहीं. शिवाय घरांत मृत्यु झाल्यावर ठरलेलं लग्न रद्द करावं असं शास्त्र आहे. म्हणून म्हणतों, एकदां लग्न मोडलं तें मोडलं.

सोर०—( हंसत ) मोडलं ! मग म्हणतां आमचं लग्न मोडलं ? अरे, अरे अरे ! मला फारच वाईट वाटतं. रावसाहेब वारल्याची बातमी ऐकली -असं वाईट वाटलं—असं वाईट वाटलं—विचारूं नका—डोळ्यांचं पाणी थांबेना ! गेल्या तेरा दिवसांत झोंप नाहीं. अन्नावर बसावं तर घांस जात नाहीं ! चांगला मनुष्य ! फार चांगला मनुष्य ! गेला ! वाईट झालं ! म्हणून म्हटलं एवढं लग्न तरी आनंदांत व्हावं ! पण तुम्ही नाहीं म्हणतां ! लकेरी ताई ! तुम्ही तरी—

लके०—सोरटसाहेब ! जाऊं द्या त्या लग्नाच्या कथा ! नकोच तें आतां. आज तुमच्यामुळं हीं मुलं दृष्टीस पडलीं, आणि वहिनीचं वेड जाऊन सगळीकडे कसं आनंदाचं साम्राज्य झालं आहे. या वेळीं उगीच कशाला हव्यात त्या क्लेशदायक गोष्टी ? तुमच्या-मुळं हा दिवस दिसला ! तुमचे आमच्यावर अनंत उपकार आहेत ! वहिनीची आणि तिच्या भावांची भेट करून जसे तुम्ही तिचे भाऊ झालां आहांत तसे आजपासून माझेहि तुम्ही भाऊच आहांत. हा संबंध कधींहि तुटणार नाहीं—सोरटसाहेब ! वाईट वाटूं देऊं नका !

सोर०—( रडक्या स्वरांत ) मला हें वाईट वाटत नाहीं, मलासुद्धां आनंदच झाला आहे. तुम्ही मोकळ्या मनानं बोललांत, हें पाहून समाधान झालं ! मी—मी येऊं आतां ? हीं पोरं—काय रे ? आतां तुम्हीं कसचीं येतां ? या साहेबाची आठवण ठेवा बरं !

अण्णा—हें काय विचारतां साहेब ! आम्ही रोज येत जाऊं तुम्हांला त्रास द्यायला !

बाळ—आम्हांला तुमच्यावांचून चैन कुठलं पडायला ?

सोर०—लकेरीताई ! पाहिलंत पोरं कशीं लबाड आहेत ! मी येतों बरं मंडळी !

लके०—या बरं—चला मीहि मुलांनां घेऊन मोटारपर्यंत येतें. चला अण्णा, बाळ, चला साहेबांना पोंचवायला. ( सोरट, लकेरी, अण्णा व बाळ जातात. )

सारं०—तरी म्हटलं आमची ताई आहे! लंके! (लंका धांवत येऊन आलिंगन देते.) किती युगांनीं भेटलीस ग! कल्पनातीत कल्पं मध्यंतरीं होऊन गेलीं असतील! चक्रवाक् पक्ष्यांमधील पानांचा पडदा-तुझ्या वेडाचा वियोग दूर होऊन पुन्हां आपला संयोग झाला. हें चंद्रग्रहण सुटलं! पौर्णिमेच्या प्रफुल्लतेची प्रभा चहूंकडे फाकूं लागली!

लंका—आपण असं काय बोलतां सगळीजणं? मला खरंच वेड लागलं होतं का? खरंच? सांगायचं ना खरंच का तें? खोटं! हो खोटंच! मला फसवायचा साऱ्यांनीं बेत केला आहे नाहीं?—पण मी नाहीं फसायची बरं—

[ पद. राग-पहाडी ताल-कवाली. ]

वदत मज कां। वेडि लंका। पदरिं जाया पुनित काया ॥ ध्रु ॥ ज्ञानसरिता। कवण सुगात्रा। त्वरित गति वरित। सुखि कराया प्रिया ॥ १ ॥

सारं०—देवा! असा अजाणपणाचा आनंद म्हणजेच सुखाचं भांडार! एवढं मला जन्मभर दे म्हणजे झालं! लंके! लंके! तुला कुठं ठेऊं असं मला झालं आहे. (तिला आलिंगन देतो. तोंच लकेरी येते.)

लके०—वहिनी, पळायला नको बरं इतक्या लगबगीनं! आतांपर्यंत माझ्या दादाला 'बाई' केलंत-'भेल्या' म्हटलंत-'माझं कुकुलं' म्हणून थोपटलंत आणि आतां अगदीं त्याच्या डोळयालाही डोळा भिडवायचा नाहीं अं! या, अशा उभ्या रहा इथं, मला पाहूं द्या एकदां हा लक्ष्मीनारायणांचा जोडा! अहाहा! कसा पण शोभतो!

सारं०—ताई! तुला आणि हमीरांना एकदां असं उभं करायला जर मला सांपडेल, तर—

लके०—खरंच दादा, या वेळीं जर अवचित हमीरांचा उदय होईल तर आपल्या आनंदाला पारावार रहाणार नाहीं.

सारं०—पण हमीर म्हणजे कांहीं सोरटासारखं शेंडेनक्षत्र आहे, तें इथं एकदम उगवेल? त्यांना इकडच्या गोष्टी तरी कळायला हव्यात?

लके०—दादा, अजून त्यांना कळायच्या राहिल्या आहेत जशा! बाबा वारल्याच्या दुसऱ्याच दिवशीं मीं त्यांची चौकशी केली, पण ते इथं नाहींत असं कळलं; तेव्हां पांचसात ठिकाणीं त्यांना पत्रं लिहिलीं. आज बारा दिवस झाले पण उत्तर नाहीं. म्हणून म्हणतें, अवचित येऊन आपल्याला आश्चर्यचकित करायचा त्यांचा विचार असेल. तसे जर आतां आले, तर काय पण बहार होईल! आहा! आहा! आहा! आशेवर निष्ठा ठेविली म्हणूनच ती निराशेचा नायनाट करून आनंदाचा एक एक देखावा आपल्याला दाखवित आहे. सुखाच्या सरितेंत आपल्याला स्नान घालते आहे. आकाशाच्या अफाट वातावरणांत आपल्याला घेऊन ती विहार करीत आहे. म्हणून म्हणतें हमीर जर इतक्यांत दत्त म्हणून हजर झाले तर हा आनंद वाऱ्याबरोबर बेफामपणानं सैरावैरा धांवूं लागेल! दशदिशा तो आपल्या खिदळण्यानं गजबजून टाकील! पहा—पहा ही संध्या आनंदानं कशी रंगून गेली आहे! हा पहा रविकिरणांनीं सोनेरी पेहेराव चढवून आनंदानं नाच मांडला आहे. तो दिव्य नाच पाहून ही मेघांची सभा आनंदानं डोलूं लागली आहे. ती पहा आकाशाच्या निळ्या पडद्यांमधून रोहिणी हळूच डोकावून पहाते आहे! ती कुणाची बरं वाट पहाते आहे? आपल्या रमणावांचून—चंद्रावांचून दुसऱ्या कुणाची?

[ पद. राग—मालकंस, ताल—त्रिवट. ]

विरहिणि झुरत मनांत। तारका। रमणा रमवाया आतुरतर॥ ध्रु०॥ व्याकुल नेत्र गवाक्षां उघडित। श्वास वदत नभिं न चंद्रकोर॥ १॥

(पदाच्या शेवटीं पडद्यांत तारवाला 'मिस् लकेरी आहेत का?' म्हणून ओरडतो.) कोण?—आहेत. आंत या.

सारं०—हा तारवाला आला. पाहूं कुणाची तार? (तारवाला येतो.) (लकेरी सही करून देईपर्यंत सारंग तार फोडून वाचतो.) "हमीर डेंजरसली इल्. स्टार्ट ॲट वन्स्. डॉ. बिलावर, राष्ट्रीय हॉस्पिटल माथेरान."

लके०––अरे देवा ! हमीर अत्यवस्थ ! एवढा वेळ आशा दाखवून शेवटीं या वेड्या जीवाला फसवायचं तर तुझ्या मनांत नाहीं ना देवा !

सारं०—ताई, अशी रडतेस काय ? धीर सोडूं नकोस.

लके०––दादा, आतां माथेरानला जायला गाडी तरी कोणची ? सहा वाजले. नवाला मद्रास मेल आहे बघ.

सारं०—पण तिला पुढं नेरळपासून गाडी नाहीं किंवा वर जायला एखादं वाहनही मिळायचं नाहीं. अपरात्रीं मेल तिथं पोचते तेव्हां ह्मणतों, सकाळच्या मेलला जाऊं किंवा पहांटेस मोटार काढूं. ह्मणजे एखादा रिक्षा तरी मिळेल !

लके०—पण हमीर अत्यवस्थ आणि पहाटेपर्यंत थांबायचं कसं ? कदाचित् पहाटेच्या आंतच–अग बाई ! नको ग बाई तो विचार ! दादा ! मी आतां निघणार !

सारं०—पण नेरळच्यापुढं—

लके०—पायीं प्रवास करीन ! कांहीं नाहीं, दोन तीन तास लागतील फार झालं तर.

सारं०—पण मध्यरात्रीं जंगलांतून वाघ वगैरे श्वापदांची भीति आहे. ताई, त्या वेळीं—

लके०––हमीरांना भेटायच्या प्रबल इच्छेपुढं कोणत्याही श्वापदाचा पाड लागणार नाहीं. मी जाणारच !

सारं०—मग चल आपण दोघंही जाऊं.

लके०—दादा ! तूं नको येऊंस. वहिनीचं वेड आजच गेलं आहे. काय नेम, पुनः उलटायचं ! जवळ कुणी नको का ?

सारं०––जवळ परमेश्वर ! लंके ! तूं राहशील ना एकटी ?

लंका––एकटी कशानं ? अण्णा, बाळ माझ्या सोबतीला आहेत ना !

लके०––मग दादा ! आतां उशीर कां ? ‘स्टार्टेड’ असा टेलिग्राम करून बसूंया गाडींत.

[ जातात.

———

## प्रवेश चवथा.

[ स्थळ:---माथेरान राष्ट्रीय हॉस्पिटलमधील रूम. ]

( हमीर एका कॉटवर पडला असून जवळ नर्स डिस्पेअर बसली आहे. डॉक्टर बिलावर येतो. )

डॉक्ट०---नर्स डिस्पेअर, कसं काय आहे ? थोडी इम्प्रूव्हमेंट ?

डिस्पे०---छेः ! मुळींच नाहीं ! हे रोगी महाराज आतां घटका दोन घटकांचे सोबती आहेत.

डॉक्ट०---नांवाप्रमाणं तुह्मी खरोखर निराशा आहां. ( एका ग्लासांत औषध घेऊन ) हें एवढं दिलं पाहिजे यांना आतां.

डिस्पे०---देऊन कांहीं उपयोग व्हायचा नाहीं विशेष.

डॉक्ट०---बाई, जरा माफ कर. हमीर ! हमीर ! सावध आहां ना ? हें औषध घ्या पाहूं. ( हमीराला औषध पाजतो. )

हमी०---( खोल आवाजांत ) डॉक्टर, मी आतां कांहीं फार वेळ जगत नाहीं. पण मरणापूर्वी लकेरीची भेट झाली असती तर बरं होतं.

डॉक्ट०---त्या आतां येतील. रात्रीची वेळ आहे. वाहन मिळायला जरा उशीर लागला असेल---

हमी०---मला आतां कांहीं सूर्योदय दिसत नाहीं. एक तास दोन तास जर मला देवानं आयुष्य दिलं---

डॉक्ट०---तास दोन तास कां ? तुह्मी असे खचून जाऊं नका. लकेरीची तुमची आतां भेट होईल. हीं पहा पावलं वाजूं लागलीं. आल्याच वाटतं. ( लकेरी व सारंग येतात. लकेरी हमीराजवळ जाऊन एकदम त्याच्या भोवतीं हात टाकते. )

लके०---हमीर ! हमीर ! काय हो आपली ही स्थिति झाली ! आणि याला कारण मीच ना ? हमीर ! मला क्षमा करा.

[ पद. राग–जोगी. ताल–दीपचंदी. ]

रुसली कां । विधुविण राका । उजळिल का नभ लोका । ग्रहणदशा अशि कां ॥ धृ० ॥ म्लान वदन हें । हृदया धाक दावित । विखरित मंगल माला । प्रियकर लाला ॥ १ ॥

हमी०—लकेरी ! तूं भेटावंस एवढीच माझी इच्छा होती. तूं भेटलीस, आतां मरणाला माझी तयारी आहे.

सारं०—हमीर !

हमी०—कोण सारंग ? तुह्मीही भेटलांत–आनंद झाला !

लके०—डॉक्टर यांना काय झालं आहे हो ? मला कांहीं ठीक चिन्ह दिसत नाहीं. हा रोग तरी काय आहे ?

डॉक्ट०—लकेरी ताई ! हा राक्षसी रोग रोग्याचं सारं रक्त शोषण करून त्याचा प्राण घेतल्यावांचून रहात नाहीं. याचं नांव–पर्निशिअस ॲनिमिया !

लके०—काय ! पर्निशिअस ॲनिमिया ! यांना ॲनिमिया का झाला आहे !

सारं०—मग याला उपाय ?

लके०—ट्रान्सफ्यूजन ऑफ ब्लडनं–रोग्याच्या शरीरांत दुसऱ्याचं रक्त भरून असला ॲनिमिया बरा होतो ना ?

डॉक्ट०—खात्रीनं. पण त्यांत त्या रक्त देणाराच्या जिवाला अपाय आहे. तेव्हां स्वतःचं रक्त देऊन कोण आपला जीव धोक्यांत घालतो ?

लके०—कां ? मी देतें–माझं रक्त घ्या ! यांचा जीव जगवायला जेवढ्या रक्ताची जरूरी असेल तेवढं रक्त माझ्या अंगांतून बेलाशक घ्या. यांच्या प्राणाकरितां जरी माझा प्राण गेला तरी हरकत नाहीं. हा जीव या प्याऱ्या जिवावरून मी असा ओंवाळून टाकतें.

[ पद. राग–भैरवी. ताल–दीपचंदी. ]

प्राणकला । प्याऱ्या जीवा । कुरबान तुला ॥ धृ० ॥ उदित उषा । पावत नाशा । तैजस जीवन देतां रविला ॥ १ ॥

हमी०—तूं आपला जीव उगीच कशाला धोक्यांत घालतेस? मी पूर्वी तेवीं मरणारच. जगेन असा काय नेम? शिवाय त्या ऑपरेशनच्या वेदना तुला नाहीं सहन व्हायच्या.

सारं०—मला सहज सहन होतील! ताई, तूं राहूं दे–मी आपलं रक्त देतों. डॉक्टर, माझं रक्त घ्या.

लके०—छेः छेः! माझंच रक्त घेतलं पाहिजे. हमीरांकरितां माझ्या-वांचून कोण रक्त देणार? कुणाला अधिकार आहे?

सारं०—मला आहे! ताई! तुझं हमीरावर पति म्हणून प्रेम आहे, पण माझंहि मित्र म्हणून नाहीं का? मित्रानं मित्राच्या जिवाकरितां स्वतःचा जीव दिला तरच तो मित्र! डॉक्टर, करा तयारी.

लके०—दादा, हमीरांवर तुझी भक्ति तशीच असेल पण मी त्यांची अर्धांगी आहे. त्यांच्याबरोबर जन्मभर सुखदुःख भोगायला आणि मरण-काळीं त्यांच्याबरोबर सती जायचा सुद्धां मला धर्मानं अधिकार आहे. हमीरावर जशी माझी सत्ता आहे तशी वहिनीची–तुझ्या धर्मपत्नीची तुझ्यावर आहे. सुदैवानं तिचं वेड जाऊन तिलाही पुनर्जन्म मिळाला आहे. तिचा संसार सुखाचा करणं तुझं कर्तव्य आहे.

सारं०—ताई, युद्धावर निघालेला वीर आपल्या पत्नीच्या सौभाग्याची पर्वा करीत नाहीं. डॉक्टर, जलदी करा. हमीर हातचे गेल्यावर काय उपयोग?

लके०—दादा, तूं नाहीं ऐकत? ऐक, तुला एकच सांगतें. तूं माझा भाऊ आहेस आणि तुझं रक्त जर हमीरांच्या नसानसांतून वाहूं लागलं तर हमीर माझे भाऊ होतील!

सारं०—अरेरे! शेवटीं हिनं फसवलं मला! डॉक्टर, घ्या हिचं रक्त. करा तयारी. (नर्स होप येते.)

डॉक्ट०—नर्स होप, तुम्हीं आलांत बरं झालं. आतां मला काळजी नाहीं. बरं लकेरीताई, या नर्स सांगतील तसं करा. मी ऑपरेशनची

तयारी करतों. ( हमीराच्या कॉटशीं दुसरी कॉट जुळवून हत्यारें वगैरे तयार करतो. ) झाली तयारी. या पडा कॉटवर. तुह्मी काळजी करूं नका. पण प्रथम हें औषध घ्या. तुह्मीं जरा थकलेल्या असाल.—ठीक. नर्स, बँडेज. ( लकेरीच्या दंडाला बँडेज बांधतो व कोपराच्या आंतल्या खळग्यातली शीर धरून ) लकेरी ताई, संभाळा. ( शीर हत्यारांनीं टोंचतो व कनेक्टिंग ट्युबिंग लावून ती हमीराच्या शिरेशीं जोडतो. ) कसं वाटतंय् ?

लके०—उत्तम ! मला किती सुख वाटतं आहे ! केवढा आनंद होतो आहे !—सांगतांच येत नाहीं. तुम्हांला लागेल तितकं रक्त घ्या. हमीर खडखडीत बरे होऊन आतां उठून बसले पाहिजेत ! खरंच डॉक्टर, माझं तुह्मीं लग्नच लावीत आहां असं मला वाटतंय्.

सारं०—अहाहा ! शुद्ध प्रेमानं बद्ध झालेल्या दोन जीवांचं इतक्या शुद्ध स्वरूपांत लागलेलं हें एकच लग्न !

डॉक्ट०—बस्स ! पुरे ! ( ऑपरेशन आटोपून—पुन्हां दोन ग्लासांत औषध घेऊन येतो. ) घ्या हें तुह्मीं दोघंही. ( हमीर व लकेरी औषध घेतात. ) आतां मुळींच भीति नाहीं दोघांनांही ! हमीर ! आतां तुह्मीं खास मरत नाहीं.

हमी०—डॉक्टर, ही तुमची कृपा !

डॉक्ट०—माझी नव्हे, या देवतेची—लकेरीची म्हणा, हमीर !

लके०—नका ह्मणूं तसं ! शपथ आहे माझी तसं ह्मणाल तर !

हमी०—मला कसलीही शपथ बाधणार नाहीं. लकेरी, तुझे उपकार मी कसे फेडूं ?

सारं०—तें मी सांगेन कसे फेडायचे ते, समजलां ? ( सोरट येतो. ) अरे वाः ! मि. सोरटसाहेब ? तुह्मीं कुणीकडे ?

सोर०—( हंसत ) इकडेच. हमीर अत्यवस्थ आहेत ह्मणून तुह्मी व लकेरीताई आल्याचं कळलं तेव्हां पोरं ऐकेनात. " आह्मांला न्या, आह्मांला न्या," ह्मणून माझा पिच्छा पुरवला त्यांनीं. तेव्हां मोटारमधून

नेरळला आलों. आणि पुढं स्पेशल ट्रेन काढून अण्णा, बाळ, लंकाताई सगळयांना बरोबर घेऊन आलों. बाहेर आहेत बघा सगळे. पण हमीर मेले वाटतं ?

सारं०—छेः ! असं काय बोलतां ? हे पहा साफ बरे झाले आहेत.

सोर०—( रडत ) बरे झाले! छान झालं । अरे पोरांनों, या रे आंत. या हो लंकाताई । ( लंका, अण्णा, बाळ घावऱ्याघावऱ्या येतात. )

सर्व—काय काय झालं ?

सोर०—( रडत ) कांहीं नाहीं. हे आहेत जिवंत ।

सारं०—कांहीं नाहीं, सगळं ठीक झालं! हमीरांच्या जिवावरचं संकट दूर झालं आणि देवानं आपल्याला आनंदाचा दिवस दाखवला.

लंके०—हमीर ! पूर्वी मी देवाशीं द्रोह केला, पण तुमच्या शिकवणीनं मी देवाला भजूं लागलें, आणि त्या करुणाघन परमेश्वरानं आज माझी आशानिराशेंतून मुक्तता करून मला कृतकृत्य केलं. त्याच्याजवळ आतां एकच मागणं आहे.

## भरतवाक्य.

[ पद राग-भैरव. ताल-एकताला. ]

जय जनता निज कांता भजतां । सांडि सती निज रुधिरा मुदिता । देश देश जप गातां ॥ ध्रुं० ॥ रुधिरशोष हा देशा ग्रासित । चल द्याया रक्ता प्रिय भारत । शांति शांति गातां ॥ १ ॥

( पडदा. )

समाप्त.



Printed by D. R. Mitra, at the Manoranjan Press, 3, Sandhurst Road, Girgaon, Bombay, and published by Vishwanath Gopal Shebye, Parvati Vadi, Mahim, Bombay.